# खडाष्टक

[ सामाजिक गद्य नाटक ]

लेखक

श्रीयुत शंकर परशराम जोशी,

बी. ए., एल्‌एल्. बी., वकील.

'विचित्रलीला', 'मायेचा पूत', 'छत्रपति', 'कालिदास',
'न्यायाचा बाजार' व 'राजे बहादूर' नाटकांचे कर्ते

द्वितीयावृत्ति—१९३३

किंमत बारा आणे

प्रकाशक
शंकर परशुराम जोशी
१२२ बुधवार, पुणें, २.



याच ग्रंथकर्त्याचें

नवीन नाटक

# राजे बहादुर

मुद्रक
अनंत सखाराम गोखले
'विजय' प्रेस, ५७० शनवार.

# दुसऱ्या आवृत्तीची प्रस्तावना

'खडाष्टक' म्हणजे कांहीं विशेष कारण नसतांना शाब्दिक भांडणाची प्रवृत्ति; यापेक्षां नाटकासंबंधीं अधिक प्रस्तावना लिहिण्याचें कारणच नाहीं. कुणाला वाटत असल्यास त्यानें पुस्तकच प्रत्यक्ष वाचावें आणि रंगभूमीवर नाटकही प्रत्यक्षच पहावें; ह्या दोन गोष्टीच्या मिश्रणानें 'खडाष्टक' व त्याचे परिणाम ह्यांची योग्य कल्पना येईल. ती कितीही लांब प्रस्तावना लिहिली तरी केव्हांही येणें शक्य नाहीं आणि म्हणूनच मी त्या भरीसही पडत नाहीं.

महाराष्ट्र नाटक मंडळी ही संस्था आहे आणि रंगभूमीवर नाटक आणण्याचें काम ह्या संस्थेनें समुच्चयानेंच केलें आहे. ही गोष्ट खरी असली तरी लेखकाच्या अंतःकरणाशीं एकरूप होऊन त्याच्या सर्व कल्पना पूर्णपणें उठावदार करून दाखविणें हें जें अत्यंत महत्त्वाचें काम तें करण्यांत मला खरोखर महाराष्ट्र नाटक मंडळीचे चालक माझे मित्र श्री० केशवराव दाते ह्यांचेंच अत्यंत परिश्रमपूर्वक साहाय्य झालें आहे आणि त्याबद्दल त्यांचे मीं शब्दानें कितीही आभार मानले तरी ते केव्हांही पुरे पडणार नाहींत. माझें पहिलें नाटक 'विचित्रलीला' सरस वठविण्यांत मला नाटक मंडळीचे माजी चालक श्री० अण्णासाहेब कारखानीस ह्यांची मदत झाली; त्या गुरूचें शिष्यत्व श्री० केशवराव दाते ह्यांनीं त्यांच्याचप्रमाणें ह्या नाटकांत मदत करून सार्थ केलें आहे असें त्यांचेबद्दल मी मोठ्या अभिमानानें म्हणतों.

महाराष्ट्र नाटक मंडळींतील नटवर्गानें पुस्तकाकरितां प्रसंगाला योग्य अशीं छाया-चित्रें दिलीं त्याबद्दल त्यांचा; तीं छाया-चित्रें उत्कृष्ट प्रकारचीं काढून

दिल्याबद्दल पुणें येथील फोटोग्राफर श्री ० नाईक यांचा; तसेंच माझे मित्र श्री० पु. श्री. काळे यांनीं रंगभूमीची सजावट करण्यांत जें कौशल्य दाखविलें आहे त्याबद्दल त्यांचा--अशा सर्वांचा मी अत्यंत आभारी आहें.

पुणें सिटी
ता. १-७-२३

ग्रंथकर्ता



खडाष्टक

# ख डा ष्ट क

## अंक पहिला

### प्रवेश पाहिला

**स्थळ**—भांडखेड्यांतील **वारोपंत चिकटे** यांच्या घरांतील किंचित् काळो-
खाची अशी एक खोली. पेटी उघडी असून रुपयांच्या थैल्या आणि
नोटांचीं बंडलें पडलीं असून तीं भांड्यांत भरण्याच्या विचारांत
वारोपंत आहे. कुणीं पाहूं नये असा त्याचा आविर्भाव-थोड्या
वेळानें **वारूबाई** हळूच दार उघडून भीत भीत प्रवेश
करते-वारोपंत दचकून आटपाआटपीस लागतो.]

**वारोपंत**—( काळोखामुळें वारूबाईला न ओळखतां वस्कन् अंगावर जाऊन ) कोण तें ? आणि वारोपंताला अगदीं आंतल्या खोलींत भेटायला ! चल हो बाहेर, फुटले तुझे डोळे ते ! अवलक्षण झालं ! नजर लागली ! दृष्ट लागली ! नीघ, नीघ एथून लवकर ! ( जवळ अंगावर जातो.)

**वारूबाई**—( मागें होऊन ) अहो पण......दुसरं कुणी नाहीं. जरा पहायचं तरी. दृष्ट पडायला परकी नाहीं कुणी. घरधनीण, यजमानांची अर्धांगी आणि मालकांची सहभागिनी मी आपलीच वारूबाई आहें हो !

**वारोपंत**—हो-हो ! भांडखेड्यांतल्या या वारोपंताची अर्धांगी तूं वारूबाई गोष्ट जगजाहीर आहे; पण ही दवंडी पिटायला आतांच इथं कशाला आलीस ? जा-जा. तुझीसुद्धां एखादे वेळीं दृष्ट लागायची ! माझं काम आटोपूं चार पैसे गांठीला जमले आहेत ते दृष्टीआड करतों, मग ये बरं बाई !

**वारूबाई**—पैसा एकदांचा पुरून टाकल्यावर मग येऊन काय उपयोग ? भूमीच्या पोटांत तो शिरला म्हणजे नेहमींच्या शिरस्त्याप्रमाणं प्राण गेला तरी बाहेर निघायचा नाहीं; म्हणून तो गडप होण्यापूर्वीच आलें हो, ऐकलं का ? आपला लाडका कवीश्वर, त्याच्याकरितांच ना हें सारं डबोलं कमवून ठेवलं ! त्याला त्याचा उपयोग झाला म्हणजे मला सारं पावलं.

**वारोपंत**—तर–तर ! म्हणे 'माझ्या लाडक्या कवीश्वराकरतांच—' बापाचा माल देणार आई अन् घेणार मुलगा !

**वारूबाई**—मग खोटं का आहे तें ? आईबापांनीं कष्ट करून डबोलं जमवा-यचं तें मुलांकरतांचना ? मुलाला उपयोगी पडावं म्हणूनचना ?

**वारोपंत**—असेल; पण आहे काय माझ्याजवळ ? आणि कसलं डंबोलं घेऊन बसलीस ? मूर्ख कुठली ! जा, घटकाभऱ्यानं बाहेर येईन आणि ऐकेन बरं तुझं म्हणणं !

**वारूबाई**—( लडिवाळपणानें ) नाहीं गडे, हें पहा, आपला कवीश्वर कीं नाहीं बी पास होऊन आलाना ? सारखा अभ्यास करून डोकं सतावलं म्हणून चार दिवस कुठं तरी हवापालट करायला जाईन म्हणतो. त्याला काय थोडासा खर्च येईल—

**वारोपंत**—खर्च–पैशाचा खर्च–आणि तो हवा खाण्यासाठीं ! जा, माझ्या-जवळ ब्र काढूं नकोस अगदीं. तूं मूर्ख आणि तो शतमूर्ख !

**वारूबाई**—असं काय बरं ? प्रत्यक्ष पोटचा गोळा. एकुलता एक सोन्या-सारखा आपला कवीश्वर—

**वारोपंत**—आहाहाहारे कवीश्वर ! नांव सोनूबाई, हातीं कथलाचा वाळा ! साऱ्या मुलुखाचा गाढव तो कवशा—

**वारूबाई**—कां बरं ? म्हटलं बी झाला आहे बी. लवकरच त्याचं नांव–छापून येईल आतां. रोज लिंबलोण उतरावं ग बाई माझ्या कवशावरून ! बी झाला बी ! मोठा थोर झाला तो आतां, चार पैसे खर्चायला मागतो, त्यालासुद्धां नकारघंटा ! म्हटलं आतां तो बी झाला आहे बी !

**वारोपंत**—बी झाला आहे बी ! मोठी धार मारली आहे पोरानं बी. ए. होऊन ! दिवे ओंवाळ त्याच्याभोंवतीं, म्हणजे पैसे मिळवायच्या नांवानं काय उजेड पाडील तें दिसेल बरोबर ! मोठा बी. ए. झाला, पण कवडी कवडी

जमवतांना इकडे त्याच्या बापसाची रेवडी उडते, एवढी साधी गोष्टसुद्धां खर्चायला पैसे मागतांना या गाढवाच्या लक्षांत येत नाहीं! कोर्टाचे उंबरठे चढतांना माझे पाय मोडले आणि याचे पाय हवा खायला धावतात! छेः! असले त्याचे छंद पुरवायाला माझ्याजवळ नाहीं पैसा. याच्या विद्येला पैसा पुरवतां पुरवतांच माझं दिवाळं—

**वारूबाई**—दिवाळं! नशीब माझं! तेवढं तें सोन्यासारखं पोर आणि एवढी (खिडकी उघडते, खोलींत प्रकाश पडतो व थैल्या, नोटा दिसतात.) ही सोन्यासारखी लक्ष्मी—

**वारोपंत**—अग, अग, अग! पाहील कुणी! (थैल्या व नोटा भांड्यांत भरतो.) बघ आतां पेटींत, झालाना खडखडाट! मग हें दिवाळंच नव्हे का!

**वारूबाई**—हो, माझ्या नशिबाचं दिवाळं आहे खरं. मीच दळभद्री आणि कपाळकरंटी! एवढी संपत्ति असून तुमच्या आपल्या सदान् कदा दिवाळखोराच्या गोष्टी.

**वारोपंत**—आणि तुमच्या खर्चाच्या गोष्टी! आणि त्या कारट्याच्या नादीं लागायला आतां लहान का आहेस तूं? बाब्या काय बोलतो, 'आई, हवा खायला जातों' आई म्हणते, 'माझा बाब्या हवा खातो!' याच्या बापानं ठेवली आहे हवा! फुकाची नाहीं मिळत! पैसे लागतात पैसे!—

**वारूबाई**—हे—

**वारोपंत**—तुझ्या बापाचेच असतील! म्हणे हे! पहाते आहे कशी आशाळभुतासारखी! तूं-बायको-माझी अर्धांगी, मला अशी चिकटून रहातेस त्याला कारण हीच सोन्याची कांडी बरं! चार लोक वारोपंताला विचारतात, कवशाही जगाच्या पाठीवर हुरडे फुंकायला न जातां माझ्याकडे अगदीं ओढल्यासारखा येतो तो ह्या पैशामुळंच बरं! हाच माझ्या जिवाचा विसांवा आणि हेंच माझं हवा खाणं! हे गांठचे चार पैसे खर्चून टाकून मग काय हातीं चौपद्री घ्यायची? चल हो चालती! आणि माझं ऐकायचं नसेल तर तूं आणि तो गद्धा कवशा करवंटी घेऊन भीक मागत जा वाटेल तिकडे हवा खायला—

**वारूबाई**—देवारे देवा! करवंटी-चौपद्री-भीक-काय हे भिकेचे डोहाळे तरी! मीच दुर्दैवी! कवशा, कारट्या, कशाला माझ्यासारख्या आईच्या पोटीं

जन्म घेऊन असल्या बापाचा लेक झालास ? पण, तो तरी काय करील बिचारा ! माझाच दोष. मीच त्याची आई झालें नसतें तर—

**वारोपंत**—फार चांगलं झालं असतं. मी त्याचा बापही झालों नसतों, आणि त्याच्या शिक्षणासाठीं पांच हजार रुपये खर्चही करावे लागले नसते. आणि आतां ते परत मिळविण्यासाठीं तितका हुंडा देणारं स्थळही पाहण्याचा खटाटोप मला करावा लागला नसता.

**वारूबाई**—मग जमव जमव जमवून एवढं तें पन्नास हजारांचं डबोलं ठेवलं आहे, त्याचं करायचं तरी काय ?

**वारोपंत**—हं, खबरदार ! तुला हजार वेळां सांगितलं त्याचं नांव काढूं नको. कवशाच्या बापाचंच असेल तें ! आणि एवढ्या मोठ्यानं बोंब मारतेस, कुणीं ऐकलं तर तुझा बाप येईल ना रात्रीं !

**वारूबाई**—हं, पोराच्या बापाचा उद्धार करतां तेवढा पुरे, आणखी माझ्या बापाचा कशाला ? त्यांचं कांहीं तुमच्याशीं लगीन लागलं नाहीं. वाटेल तशी लाथाडायला तुमची बाईल झालें आहें मी. कशाला रे देवा असली दुर्भागी पोर त्यांच्या पोटीं जन्माला घातलीस ? तरी बरं, मला बाईल करतांना माझ्या बापाचं नाक दाबून चांगला दोन हजार रुपये हुंडा ओकवलात—

**वारोपंत**—तो एकदांच; पण रोज तूं हंडाभर म्हशीसारखं इथं आंबोण गिळतेस ती ? दोन हजार रुपयांचं सव्याज उट्टं काढलंस ! आज पंधरा वर्षें घरांत घिसाड घुशीसारखी चरते आहेस, तुझ्या बापानंच घातलं असेल इतके दिवस गिळायला ! ह्या तुझ्या एकाच थोबाडानं दोन हजारांची दामदुप्पट तरी खाल्ली असेल आजवर.

**वारूबाई**—घरांत कुणी नोकर ना चाकर ! लग्नापासून निव्वळ एखाद्या हमालणीसारखी राबतें आहें याचा कांहींच हिशेब नाहीं !

**वारोपंत**—आणि तुझ्या कारट्याची चराई ?

**वारूबाई**—भरील तो आपलं पोट कसंही. आणि मी पण आजपासून खाणंपिणंच सोडून देतें. मरून जाईन एकदांची !

**वारोपंत**—तूं मरून मला आणखी मर्तिकाचा खर्च कशाला तो ? साफ सांगतों, मी कांहीं पैसे खर्च करून, कवशाला हवा खायला पाठवणार नाहीं.

**वारूबाई**—पोटच्या पोरासाठीं एवढासासुद्धां खर्च करवत नाहीं, तर आग लागो त्या ड्बोल्याला !

**वारोपंत**—पुन्हा पुन्हा डबोल्याचं नांव काढतेस ! आतां मोठ्यानं बोल तर खरी म्हणजे फाडकन् इकडचं थोबाड तिकडे करून टाकतों, कीं पुन्हा जीभ म्हणून वटवटायला नको ! ( मारायला हात उगारतो इतक्यांत—)

**कवीश्वर**—( प्रवेश करून ) बाबा, बाबा—

**वारोपंत**—तूं आलास का आणखी ? पहा, चांगला माजला आहे आणि म्हणे हवा खायला जातों ! कां, जन्मभर पुढं हवाच खायची आहे ? कायरे, कसलारे हवापालट करतोस ! इथं काय स्मशानाची हवा आहे, होय ? पैसे खर्चून तुझ्या बापानं ठेविली आहे हवा ! आजकालच्या ह्या पोरांना घरच्या हवेची घाण येते आणि बाहेर उकिरडे फुंकायला मात्र—

**वारूबाई**—देवा !-देवा ! सोडीवरे बाबा एकदांची मला ह्या नरकवासांतून ! ( हुंदके देऊन रडूं लागते.)

**कवीश्वर**—आई, रडूं नको गडे. माझा कांहीं हट्ट नाहीं. बाबा, परीक्षेच्या अभ्यासानं डोकं त्रासलं होतं, तेव्हां म्हटलं एखाद्या रम्य ठिकाणीं—

**वारोपंत**—बस्स, बस्स ! बी. ए. झालं म्हणजे टाळकं बिघडलंच पाहिजे. कवडीची कमाईसुद्धां नाहीं अजून आणि गमाईला तेवढा तयार ! लग्न होण्याइतकीसुद्धां बेट्याला अक्कल नाहीं ! एक बायको तर मिळवून दाखव !

**वारूबाई**—एकच काय, छप्पन्न बायका मिळवील माझा कवशा. हो, आहेच तसा तो. मग कां उगीच त्याला भलतंच बोलायचं ! पंधरांचा मुलगा असतो खुळगा; झाला सोळांचा पुत्र म्हणजे मानावा मित्र-आहे का ठाऊक ?

**वारोपंत**—मोठी आली आहे शहाणी पोराचा कड घ्यायला ! चांगला चोविसांचा रिंड माजला आहे, पण अंगांत कांहीं काम आहे का ? शिकूं नको म्हणत होतों, ऐकलं नाहीं; हजाम कुठला ! डोक्यावर एक केंस राहूं दिला नाहीं माझ्या ! पांच हजार-अगदीं कलदार रोख शिक्षणाला खर्च केले, पण मुलींचे बाप कसे गद्धे आहेत पहा ! कुणी एक हरामखोर तेवढेसुद्धां रुपये हुंडा द्यायला तयार होत नाहीं ! बस्स ! कुठं जायचं नाहीं आणि यायचं नाहीं.

**वारूबाई**—म्हणजे शेवटीं चार दिवससुद्धां नाहींचना पाठवायचा त्याला हवा खायला ?

**वारोपंत**—नाहीं-नाहीं ! आपल्या या भांडखेड्याचीच हवा कालपासून पालटली आहे असें सकाळींच वैद्यबुवा म्हणत होते—

**कवीश्वर**—हो, आई, तापसराई सुरू झाला आहे खरी !

**वारोपंत**—गप्प ! मग पैसे खर्च करून दुसरा हवापालट रे कशाला हवा ? त्यापेक्षां खळ्यांत बैलांबरोबर घटकाभर पात ओढायला लाग म्हणजे संसाराला तरी उपयोग होईल तुझा. कोर्टांत अनेक फिर्यादी आहेत त्यांत जबान्या द्यायला तरी जात जा. फुकटया कुठला ! चल, हो चालता इथून !

**कवीश्वर**—हें कुणाचं पत्र आलं आहे बाबा ?

**वारूबाई**—पत्र ! कुणाचं ?

**वारोपंत**—आणि कशाला तें ? उत्तराला दोन दिडक्यांचा खर्च उगीच. ( पत्र फाडून पाहून ) तणतणपुराहून आलेलं रागोपंत कटकट्यांचं ! काय म्हणतो ? " घरच्या कटकटीनं जीव अगदीं त्रासून गेल्यामुळं चार दिवस मी तुमच्याकडे राहायला येणार आहें. बऱ्याच वर्षांत झाली नाहीं ती आपली भेट होईल आणि खेड्यांतल्या मोकळ्या हवेनं प्रकृतीला बरं वाटेल. गौरीचं लग्न अजूनही कुठं जुळलं नाहीं. तुझ्या मुलासंबंधीं पुन्हा एकदां विचार करूं. तूं नाहींच म्हटलंस तर आसपास एखादं स्थळ तरी बघूं." अस्सं ! रागोपंताच्या मागं घरची कटकट—

**वारूबाई**—नेहमींचीच आहे मेली. या वेळीं दोघांत कांहीं विशेष खटका उडालेला दिसतो. काय बाई तरी, नवरा-बायको इतकीं भांडतात तरी कशीं ?

**वारोपंत**—अग, तुझ्या माझ्यासारखींच ! आणि तीं भांडणं टाळायला स्वारी इथं येणार ! छे : ! हा श्रीमंत लखमीदास, कवशाचा पांच हजार रुपये हुंडा द्यायला तयार होत नाहीं तो नाहींच आणि वर आणखी माझ्यामागें सरबराईचा खर्च लावणार !

**वारूबाई**—काय ग बाई तरी हा दळभद्रेपणा ! ते तुमचे फार दिवसांचे, अगदीं लंगोटीयार मित्र ! चार दिवस आले तर एवढासा खर्च होईल तोसुद्धां डोळ्यावर येतो. ते लखमीदास व आपण अगदीं भिकारीदास—

**वारोपंत**—गप्प बस ! तुला नाहीं समजत. तो इकडे येण्यापेक्षां आपणच तिकडे गेलों तर ? हो, मलाही इथं खेड्यांतील मोकळी हवा खाऊन कंटाळा

आला, अगदीं खालावली आहे तब्येत. शहराच्या कोंदट हवेनं थारेपालट होईल आणि चार दिवस शहरांत राहायला सांपडेल. मित्रच तो. चार आठ दिवस त्याच्या घरीं जाऊन त्याला खर्चांत घालायचा हक्कच आहे माझा !

**कवीश्वर**—पण बाबा, शहरापेक्षां हवा खेड्याचीच चांगली ! शिवाय उगाच जाण्यायेण्याचा खर्च.

**वारूबाई**—तुला नाहीं समजायच्या त्या गोष्टी. अरे, मांजर पाहुणं जायचं आणि लोणी खाऊन यायचं, असा असेल हो कांहीं तरी यांचा तिकडे जाण्यांत डाव !

**वारोपंत**—बरोबर ! अस्सं नेहमीं माझ्या बाजूनं सुधं बोलत गेलीस म्हणजे कशाला येईल भांडणाचा प्रसंग ? अग, रागोपंत इथं यायचा-म्हणजे आपण नाहीं म्हटलं तर दुसरीं स्थळं पाहणार. त्यापेक्षां तिथं जाऊन कवीश्वरा-शिवाय दुसरीं स्थळं शोधण्याची त्याला सवडच देऊं नये, म्हणजे पांच हजार हुंडाच्या हुंडा, आणि गौरीसारखी-निपुत्रिक श्रीमंत बापाची मुलगी ह्या तुझ्या गोमट्या पोराला !

**वारूबाई**—श्रीमंताची मुलगी आणि अजून लग्न होत नाहीं म्हणजे तिच्यांत कांहींतरी गोम असली पाहिजे. तसं असेल तर मी तुमच्याबरोबर येतही नाहीं आणि माझ्या कवशाला असली मुलगीही पण नको. जायचं असलं तर तुम्ही जा एकटे.

**कवीश्वर**—हें ग काय आई ? बाबा तयार झाले कीं तूं नाकबूल आणि तूं तयार झालीस कीं बाबा नाकबूल. ( आईला एकीकडे ) शिवाय हें बघ आई, गौरी काळी का गोरी अजून तूं पाहिलीसुद्धां नाहींस.

**वारूबाई**—अरे, पण फार तोंडाळ म्हणून तिचा बभ्रा ऐकला आहे ना ! दोन चार वेळां भाऊजींनीं तुझ्याबद्दल प्रयत्न केले होते, तेव्हां ह्यांनींच केली होती चौकशी.

**कवीश्वर**—हो; पण आतांच कशाला तिच्यावरून भांडण, मला आयतं जायला मिळतं आहे, त्यालाच खो बसायचा.

**वारोपंत**—पाहिलंस ! नेहमीं असं खडाष्टक वाजवायची आपली संवयच तिला. तें कांहीं नाहीं. तिघांनीं जायचं आणि तें आजच्या आजच. रागोपंत घराला कंटाळलेला, चट्‌दिशीं तोच इकडे निघून यायचा ! प्रवासखर्चाची बाब

आहे, येईल लग्नाखर्चांत काढून घेतां ! आणि कवशा-दोघं कुजबुजतां काय एक-मेकांशीं ? सर्वांनीं जायचं ! तुलाही बायको पहायला सांपडेल, हो. लग्नानंतर आवडली नाहीं तरी लग्नाआधीं मुलाला दाखवली नव्हती असं नको कोणीं म्हणायला ! तेव्हां ठरलं, लागा तयारीला. हें पहा, माझं उपरणं, पगडी आणि तुझीं सांठवणीचीं लुगडीं यांची बांधाबांध तूं कर आणि कवशा, तिकिटें ठेव आधींच काढून. माझं एक, मुलाचं म्हणून तुझं अर्धंच चालेल ! हीसुद्धां ठेंगणी ठुसकी लहानसरच आहे, निम्या दरापुरती मुलगी म्हणून चालवतां आली तर बघ यत्न करून

**कवीश्वर**—कुणाची बाबा ?

**बारोपंत**—आलीच वेळ तर सांग माझी म्हणून ! मूर्ख कुठला ! पाहिलास कसा मूर्ख आहे तो ?

**बारूबाई**—कशाचा मूर्ख ! मूर्ख आपली मी. शहरांत राहून माझा कवशा किती शहाणा झाला आहे ! काय, काय, काय, काय ज्या शहरच्या गोष्टी सांगत असतो—

**बारोपंत**—काय, काय, काय, काय सांगत असतो ?

**बारूबाई**—म्हणतो, शहरी बायका किती शहाण्या. नवऱ्यापासून नेसायला शेले, शालू घेतात. शहरांत गेल्यावर माझा कवशा देणार आहे मलासुद्धा एक शालू घेऊन. होय नारे कवशा ? आतांच सांगितलं यानं मला ! ( कवशा बोलूं नको म्हणून खूण करतो; पण तिला समजत नाहीं.) म्हणून तर मी यायला तयार झालें !

**बारोपंत**—अस्सं ! दोघांना आधीं बजावून ठेवतों, शहरचे कांहीं चोचले करून खर्च वाढवाल तर ती गोष्ट मला बिलकुल पसंत पडायची नाहीं. जा ग, तूं तयारी कर; तूं तिकिटं काढ. तोंवर मी तो तांब्या पुरून ठेवतों. [ जातो.

**कवीश्वर**—आई, तूं अशी हिरमुसली होऊं नकोस. मी सारं तुझ्या मनासारखं करीन. आतां झालं ना ? जा, तयारीला लाग. बरंचसं थालीपिठ लावून घे हो बरोबर. जा, जा. ( होकारदर्शक मान हालवीत बारूबाई जाते.) काय हा बाबांचा स्वभाव तरी ! मीं हळूच आईची समजूत घातली नसती तर आतांच दोघांचं खडाष्टक उडायची वेळ येऊन माझं जाणंच

अजीबात राहिलं असतं. आई पण तशीच.—एवढ्या तेवढ्या कारणावरून घरांत दोघं उगीच अहोरात्र भांडत असतात. पण, मला योजिलेली ही गौरी-रागो काका आणि रागिणीकाकू या भांडखोर खडाष्टकांची ही मुलगी-कशी काय असेल बरं ? भांडखोर ! दुसरं काय ? मी निव्वळ भांडखोर कां बरं झालों नाहीं ?—भांडखोर नसलों तरी दुसऱ्याची कुचाळी करण्याचा स्वभाव आहेच माझा. फक्त विद्येचा थोडाबहुत संस्कार झाल्यामुळं भांडण आवडत नाहीं इतकंच. तशीच गौरीही सुधारलेली असेल का ? आम्हां दोघांचेही आईबाप भांडखोर; आमचं लग्न जुळविण्यांत त्यांचं एकमेकांशीं कितपत जुळेल हा प्रश्नच आहे आणि यांनीं जुळवलंच तरी गौरीची नीटपणें परीक्षा केल्याशिवाय आपण नाहीं बुवा लग्नाला तयार होणार ! हो, भांडखोर आईबापांचीं आम्ही भांडखोर मुलं; अशांचं लग्न व्हायचं म्हणजे हा भांडखोरपणा वंशपरंपरा पुढं चालून भांडखोरांची एक स्वतंत्र जातच निर्माण व्हायची ! तेव्हां पुढं लक्ष ठेवूनच चाललं पाहिजे.

**वारोपंत**—( पडद्यांत ) कवशा, ए कवीश्वर, गाढवा, तिकिटं आणायला ना जात होतास तूं ? बाराची गाडी, सात वाजले, नऊ वाजतांना स्टेशनवर गेलं पाहिजे. बायकोच्या विचारांत गुंगला नाहींसना ? मांडं पुरून मी पूजा आटपतों, तोंवर तिकिटं काढून आण. जा लवकर.

**कवीश्वर**—हा चाललोंच मी. बाबांची तर खरोखर वऱ्हाड निघाल्या इतकीच धांदल चालली आहे ! [ जातो

## प्रवेश दुसरा

[ **स्थळ**—तणतणपुरांतील रागोपंताच्या बागेचा फाटकाकडील भाग—
**कर्कशराव कटकटे** कोंकणी म्हाताऱ्याच्या वेषांत-वय साठीपलीकडे;
खांद्यावर पडशी, दोरी, शिंकाळी, हातांत काठी व कापडी
छत्री, वहाणा-असा येतो.]

**कर्कशराव**—( खांद्यावरील सामान ठेवून धोतरसोग्यानें वारा घेत बसतां बसतां ) घटका गेली, पळें गेलीं, तास वाजे ठणाणा । आयुष्याचा नाश होतो राम कां रे म्हणाना ॥ हुश्‌श्‌श्‌ ! दमलों अगदीं. पण एकदांचा तणतणपुराला

येऊन पोंचलों. राग्याचें मकाण अजून किती लांब आहे कोणास कळे! रांडेच्याल दोन चार दिवसांत केव्हां तरी येतों म्हणून पत्र धाडलें होतें; पण ठेशनावर कांहीं आला नाहीं. त्याचें मकाणही कुणी रांडेचा सांगेना! तेव्हां आतां जरा इथेंच पासलतों म्हणजे बरें वाटेल. अबबब! अठरा वीस वर्षें झालीं, पोरानें तोंड म्हणून दाखविलें नाहीं. आणि गाढवीचा माझी अवज्ञा करून घरांतनें गेला म्हणून मीं पण त्याचें तोंड पाहिलें नाहीं. मधून मधून खर्चाबिर्चास धाडी, पत्रें पाठवी; पण तेवढ्यानें का कोटें भागतें! त्याला काय रांडेच्याला! पण माझा आंतड्यांचा पीळ राहीना. वय झालें, फटदिशीं जीव जायचा एखाद वेळीं. तेव्हां म्हटलें राम म्हणावयास पोराजवळ जाऊन पडावें. शिवाय त्याच्या पोरीचें लग्न—नातीच्या बारशाचें पत्र आलें त्यास आज सोळा सतरा वर्षें झालीं, तरी अजून लग्नाची कुंकुमपत्रिका नाहीं. पांच सहा वर्षें झालीं, मी त्यास सारखा लिहितों आहें. अजून लगीन होत नाहीं म्हणे. आजवर पतवंडाचें तोंड दिसून घरच्या घरीं मला काशीयात्रासुद्धां घडायची! मग पोरगी काय वेंधळीबिंधळी आहे कीं काय, कोणास कळे! का तिला मडम करायची आहे याच्या मनांत? पण आतां या राग्याचें ठिकाण कोण दाखवणार? ( नजर वर करतो तोंच वक्रतुंड ओणवून त्याला निरखून पहात आहे, सबब दोघेही एकमेकांकडे आश्चर्यचकित होऊन पहातात.) कोण रे तूं!

**वक्रतुंड**—अस्माकं! पितामह, वयानं इतके पुरातन झालांत तरी या महापुरुषाचें नामसंकीर्तन आपल्याला प्रख्यात असूं नये? आश्चर्याचा प्रकोप झाला! आमचे यजमान रागोपंत कटकटे यांचें अहोरात्र सेवन करून त्यांच्या शागीर्दाच्या महत्पदावर कायमचा रूढ झालों आहें. वक्रतुंड संस्कृते असा सर्व जगभर माझ्या नांवाचा लोकापवाद आहे.

**कर्कशराव**—वक्रतुंड संस्कृते—रागोपंताचा शागीर्द तूं! मग हें राग्याचेंच कां रे मकाण? काय रे; ओणवून ओणवून पुन्हा पुन्हा माझ्याकडे असं निरखून रे काय बघतोस?

**वक्रतुंड**—जीर्णवस्तुसंशोधन करीत आहें—

**कर्कशराव**—गाढवा!

**वक्रतुंड**—हं! हं! आपण आपल्या वदनशंखाचा असा पांचजन्य करूं

नका. वहिनीबाई निद्रावगुंठित आहेत, तुमच्या शंखनादानं त्या उत्थापित होतील, तप्त होतील, इथं अवतीर्ण होतील !

**कर्कशराव**—वहिनीबाई कोण ? रागोपंताची बायको का रे ? प्रहरभर दिवस आला तरी अजून निजलेलीच अं ? घटका गेली, पळें गेलीं, तास वाजे ठणाणा । आयुष्याचा नाश होतो राम कां रे म्हणाना ! वा रे बायको !

**वक्रतुंड**—हं, हं, हं ! वृद्ध कपी—

**कर्कशराव**—( काठी उगारून ) चल गाढवीच्या—

**वक्रतुंड**—खबरदार ! जिव्हेचा अवष्टंभ करा. तुम्ही वयानं तर मी संस्कृतानं पुरातन आहें. हातांतलें तें शुष्कपर्णावगुंठित तमाखूपत्र जरा इकडे करा पाहूं. म्हटलं थोडं सहपान करूं, हं, हं ! इतकं तप्तायमान व्हायला कः त्वम् ? कुत आयातः ?

**कर्कशराव**—कः त्वंम् ? कुत आयातः ? मी तुझ्या बापाचा बाप-फुटले डोळे ! दिसत नाहीं तुला ! आलों मसणांतून !

**वक्रतुंड**—हां, हां ! वयानं भूत होतां ते भविष्य झालांत; म्हणजे आपण न भूतो न भविष्यति आहांत ! बापाचा बाप ! बापरे ! म्हणजे आजोबा अं ? मग इथं बसून असे सार्वजनिक आजोबा कां होतां ?

**गौरी**—( प्रवेश करून ) कोण आहे रे वक्रतुंड ?

**वक्रतुंड**—वानरो वा नरोवा—( कर्कशराव संतापानें लाल होतो; परंतु गौरी वक्रतुंडाला दाबतांना पाहून शांत होतो.)

**गौरी**—कोणी म्हातारबुवा आहेत. उगीच कशाला रे त्यांची चेष्टा करतोस ? मूर्खा, ते आपल्याला आजोबा शोभतील !

**वक्रतुंड**—शांतं पापम् ! हा वक्रतुंड कोण, त्याचं तें मीं प्रवचन केलें, ताईसाहेब !

**कर्कशराव**—( उठून जवळ जाऊन गौरीला निरखीत ) ही कोण ठुमकी ? कोण गो ? किरिस्तावाची का मुलगी आहेस ? एवढी छबी नटविली आहेस, कोणी पहायला का येणार आहे तुला ?

**गौरी**—तुम्ही यायचे होतेतना पहायला ?

**कर्कशराव**—नांव गो काय तुझें ?

**गौरी**—माझें नांव—

**धक्कतुंड**—हा आमच्या यजमानांच्या ब्राह्मण्याचा उत्पात आहे. यजमान-यजमानिणींच्या संसारसुखाचा हा प्रकोप आहे. दोघांच्या खाजगी प्रेमाचें हें सार्वजनिक दृश्य आहे. यांच्याकरितां 'वर पाहिजे' म्हणून यजमानांनीं वर्तमानपत्रांत घोषणा केली आहे. यांना चतुर्भुज करणारा कोण, केव्हां येईल याचा काय नेम! म्हणून त्याच्या नयनछिद्रांत भरण्याकरितां कुमारिकेचें हें फिरतें प्रदर्शन आहे. यांचें नामाभिधान—

**रागिणी**—(पडद्यांत) गौऱ्ये, ए गौऱ्ये! अगदीं नांवाप्रमाणं शुद्ध गवरी! थाब, तुला लांकडानंच चांगली फोडली पाहिजे. साऱ्या मुलखाची चवढाळ कारटी, 'ते आले का पाहून ये' म्हणून सांगितलं तर आली तिकडे आली आणि आल्यागेल्याशीं हुजत घाली! (प्रवेश करून) ते तसे आणि कारटी ही अशी! तुम्ही तेवढीं अगदीं मनाप्रमाणं नांदा आणि माझा मात्र मधच्यामध्यें चेंदामेंदा ग बाई चेंदामेंदा!

**गौरी**—अग, पण हो आई, एकदम असं अवतरल्यासारखं काय करतेस अगदीं! हा कोण म्हातारा आला आहे त्याची चवकशी नको का करायला?

**रागिणी**—दांडग्या पोरी या अशा, उगीच साऱ्या गांवाच्या चवकशा! असेल मेला कुणी मसण्या! तुला ग काय करायचं आहे?

**गौरी**—कुणी राजापुऱ्या कोंकण्या भट दिसतो, आई!

**कर्कशराव**—तुझा बाप कोंकण्या भट! चांगला गृहस्थ मी, तुला दिसत नाहीं!

**धक्कतुंड**—(स्वगत) परशुरामक्षेत्रोत्पन्न हें मोठं कडक ब्राह्मण्य उपस्थित झालं आहे बुवा!

**रागिणी**—न दिसायला आमचे डोळे काहीं फुटले नाहींत भटो. म्हटलं इथं असा फतकाला घालून बसायला हा कांहीं आल्यागेल्याकरिता केलेला बाग नव्हे.

**कर्कशराव**—वा! वा! वा! वा! या आमच्या सूनबाई! बेश आहे राग्याचा संसार!

**गौरी**—ऐकलं का आजोबा! म्हटलं देवानं एवढे मोठे कान दिले आहेत ते कांहीं नुसत्या चष्म्याच्या काड्या अडकवायला नाहींत. उठा आणि धरा आपला रस्ता.

**रागिणी**—उठा, उठा म्हणतेंना ! व्हा चालते इथून आणि जा कुठे मसणांत जायचें असेल तिथें.

**कर्कशराव**—घटका गेली पळें गेलीं, तास वाजे ठणाणा। आयुष्याचा नाश होतो राम कां हो म्हणाना ? [ वक्रतुंडही ताल धरतो.

**रागिणी**—कुणीं म्हटलं आहे नको म्हणून ? मेलीं येतात तीं सारीं त्रास द्यायलाच ! चला. चला इथून. [ म्हातारा हालत नाहीं.

**गौरी**—आतां काय करावं ? थांबा, बाबा आले म्हणजे सांगतें त्यांना.

**रागिणी**—नाहींचना अजून आले ते ! मीं लवकर या म्हणून सांगितलं होतं ना ? मग कसे येतील ? उशिरामुळं माझं डोकं तर कसं पित्तानं ठणठणतं आहे. तूंच चल आणि टाक तें एकदांचं ठेंचून वरवंट्यानं !

[ तिचा हात धरून ओढीतें जातां जातां.

**गौरी**—पण आई ! हा म्हातारा अजून हालत नाहीं बघ !

**रागिणी**—तो आम्हां बायकांचं थोडंच ऐकणार आहे ! थांबा, आतां ते घरीं आले म्हणजे सांगतें तुमचा चांगला समाचार घ्यायला. [ जातात.

**वक्रतुंड**—हा यजमानांच्या अर्धांगवायूचा झटका—

**कर्कशराव**—काय, काय ? तुझ्या यजमानाला अर्धांगवायु—

**वक्रतुंड**—नव्हे हो ! पतीचें पत्नी हें अर्धांग, तें असं वातबद्ध आहे. खुद्द यजमान कांहीं आगंतुकाला अस्पर्श मानीत नाहींत. तेव्हां पितामह, तुम्ही अवतीर्ण झालांच आहांत तर, इथंच आतां स्थिर व्हा झालं. यजमान स्वागतशील आहेत, आपणही वृद्धावस्थापीडित आहां, मी शिफारस करीन. यजमान येईतों कूपजलांत अवगाहन करा, देहयष्टीवर मार्जनाचें जलोड्डाण करून घ्या, स्वर्गप्राप्ति होण्याकरितां सूर्याला अर्घ्यांनीं जलदान द्या. पूर्वेपासून सूर्य बराच लंबायमान झाला; अस्वस्थ व्हा, उठा. स्नानांतरेण भस्माची चर्चा कर्तव्य असेलच; तें हस्तगत करून आणण्यासाठीं आतां मी अंतर्धान पावतों. आपण चरणासक्त व्हा.

[ जातो.

**कर्कशराव**—घटका गेली, पळें गेलीं, तास वाजे ठणाणा। आयुष्याचा नाश होतो, राम कां रे म्हणाना ॥ हे आमचे शागीर्द आणि त्या आमच्या सूनबाई ! पात्रें पण पात्रें ! हडळींची वार्ता कानीं आली, दर्शन होतांच पटून गेली. घरांतून पळून जाऊन वडीलधाऱ्या माणसांना न विचारतां केलेल्या लग्नाची गत अशीच

व्हायची ! आणि त्या कैदासणीची पोर, ती कारटी गौरी, ब-ब-ब-ब ! अगदीं उफाडयाची पोर, केवढी तरी घोडी वाढली आहे लग्नाला ! वाढायचीच ती ! तिचा बापुस तो राग्या,—आगाऊ ठेशनावर आला नाहीं तो नाहीं आणि त्याचा बापुस घरीं आला तरी अजूनही त्याचा पत्ता नाहीं. ह्याच वेळीं बाहेर जायला कुणाची स्मशानयात्रा अडून राहिली होती कीं काय ? अरे रामराम ! सारीं सारखीं ! या महारांच्या दर्शनानें सचैल स्नानच केलं पाहिजे. चला, पाप झडून जायला पोराच्या आणि सुनेच्या नांवानं आजचें हें पहिलें स्नान ! तास वाजे टणाणा। आयुष्याचा नाश होतो राम कां रे म्हणाना ॥

[ जातो—पडदा पडतो.

---

# प्रवेश तिसरा

[ **स्थळ**—रागोपंताचें स्वयंपाकघर. स्वयंपाक आटोपून **गर्गशा** बसली आहे.]

**वक्रतुंड**—( लुगडयाचा पिळा झाडीत प्रवेश करतो. स्वगत ) अब्रह्मण्यम् ! अब्रह्मण्यम्! या सटव्या गर्गशेचें अवधान ओढतां ओढतां तिचें आंगवस्त्र धुण्यासाठीं करतलांत घेण्याइतका मी पतितसुद्धां झालों; पण तिच्या हृदयकाठिण्याचें कांहीं अजून निर्दालन होत नाहीं ! काय करावं म्हणजे ती अस्मादिकांचं पतितपरावर्तन करील बरं ? गर्गशे—( लुगडें खालीं पाटावर ठेवून सचिंत स्तब्ध होतो.)

**गर्गशा**—अहो-अहो, वक्रतुंड. माझं लुगडं धुऊन आणलंत, तसंच तें वाळत टाका आणि आपल्या करकमलांत शेण घेऊन तिथं लावून झटकन् आधा पाटपाणी करा पाहूं.

**वक्रतुंड**—तें करतों मी. पण तूं केव्हां संसाराच्या संस्थानावर प्रतिष्ठित करणार मला ?

**गर्गशा**—आतां काय त्याचं.! यजमानीणबाई येतील आणि तयारी नसली तर चांगली शेणमार करतील कीं !

**वक्रतुंड**—पण आधीं तुझं अन्नपचन झालं का गर्गशे ? तुझ्या स्वयंपाकाचा



**गर्गशा**—जाता कीं नाहीं इथून ! [ पृष्ठ १५.

अंत झाला असला, तर देवरचनेपूर्वी थोडा चहा कर्तव्य आहे. बहूनि कपानि नको, पूर्ण पंचपात्र पुरे.

**गर्गशा**—जेवायची वेळ झाली आणि आतां पांच कप चहा! ठेवला आहे तुमच्या काकोबांनीं! आाणि सांगूं का बाईसाहेबांना?

**वक्रतुंड**—हां, तूं बायको असलीस तरी असल्या तप्त शब्दांनीं माझ्या काकांचा प्रसव तुला कर्तव्य नाहीं; बाधा होईल. गतसंवत्सरीं तुझी माता मर्त्य झाली, तेव्हांपासून तूं अनाथ गाय, गोरक्षण मीं केलं, तरी माझ्यावर असं तीव्र नेत्रसंधान कां? अघोर कृतघ्नता आहे. तप्त न होतां बऱ्याबोलानं चहाभोग देतेस, कीं घराला रेचना लागली आहे तुझ्याकडून, त्याची वेदना करूं बाईसाहेबांना!

**गर्गशा**—जा अं! खुशाल सांगा जा, जा.

**वक्रतुंड**—तसं नव्हे ग, गर्गशे! तूं आमची गृहिणी आणि पाच्यवस्तु-संग्रह तुझ्या सन्निध म्हणून घराची संग्रहणीसुद्धां तूंच. आमच्या पोटयज्ञाचा कर्मविपाक तुझ्या ताब्यांत, मग आहुति ग कुणाजवळ मागावी?

**गर्गशा**—कंटाळलें जीवाला मी! दिवसभर कामाचा रगाडा. एकीकडे बाईसाहेबांचा त्रास, एकीकडे तुमचा त्रास!

**वक्रतुंड**—मी यजमानांचं सेवन करतों; स्वयंपाकाला दुसऱ्याच्या दारीं येऊन तूंही परदारागमन केलंच आहेस—

**गर्गशा**—बरं, मग?

**वक्रतुंड**—आतां कुरकुर कां?

**गर्गशा**—देतें सोडून ही नोकरी आणि जातें आपल्या खेडयाला.

**वक्रतुंड**—मग आमची भावना कशी होईल? आमचं अन्नपचन कोण करील? आणि गर्गशे, तूं इथं शहरांत चिटाचं वस्त्र परिधान करून पौरजननी म्हणून चांगली वेषा आहेस, ती खेडयांत प्रादुर्भूत होऊन ग्रामवेषा होणार; विचार महा भयानक आहे. तुला यजमानांचा संन्यास कर्तव्यच असेल तर इथंच शहर-वासिनी राहून आणि अन्नपण्यगृह संस्थापून पण्यांगणा कां होत नाहींस? तूं तुझं आचार्य सोड; मींही माझं सेवन सोडून स्वतंत्र चहाभोगभांडार तुझ्या पण्यगृहाला जोडतों! अन्नपचनांत तूं विद्वान्, मी पांडित्यप्रचुर! आपलं दोघां दग्धांचं दांपत्य चांगलं सज्ज होईल. खरोखर ह्या वर्यात

तूं केंव्हांच' वधू व्हायचीस, वयांत फार वर्धना झाली, आतां वैधव्यनाशन करणार तरी कधीं ?

**गर्गशा**—काय हें तुमचं अभद्र बोलणं तरी ?

**वक्रतुंड**—कां, कां, कां ? गीर्वाण भाषेंत वधूचें भाववाचक रूपांतर वैधव्यांत होतें. त्याला माझी भद्रता काय करणार ?

**गर्गशा**—पुरे करा तुमची बडबड इथं ! आणि देवघरांत जाऊन वाजवा मोठ्यानं तो शंख. पूजा व्हायची आहे ना अजून ?

**वक्रतुंड**—चहा ! ( जमिनीवर मूठ आपटतो. ती भांड्याच्या कांठाला लागून हात दुखावतो.)

**गर्गशा**—जातां कीं नाहीं इथून ! यजमानांची वाट पाहून दमलें. पडूं द्या मला क्षणभर. [ चुलींत तापत घातलेली पळी हातांत घेऊन अंगावर धांवते, त्यामुळें हात भाजतो, म्हणून पळी टाकून तळमळते व वक्रतुंड जलदीनें निघून जातो. गर्गशा पाटावर डोकं टेंकते.]

**रागिणी**—( पडद्यांत ) काय गडबड आहे तिकडे ? गर्गशे, नाहींचना आले अजूनसुद्धां ते ? आतां येतील तेव्हां येतील ! माझं आपलं पान वाढून आण इकडे. आलीस का ? ते आले नाहींत आणि या मेलीचे सुद्धां कान फुटले वाटतं ! ( रागानें पाय आपटीत बाहेर येते.) पहा पहा, दहा वाजून गेले, भुकेनें माझ्या अंगाचा दाह झाला आणि इथें पडली आहे खुशाल पासली. यजमानीण मेली म्हणून स्वयंपाकिणीला थोडंच सुतक यायचं आहे ? ढोंसला असेल किटलीभर चहा.

**गर्गशा**—(उठून) कुठला आमच्या नशिबीं ? आतांशीं कुठं दहा वाजले आणि इतक्यांत पित्त उसळायला काय झालं ? उठल्याबरोबर दोन कप चहा झाला, तोंड धुतल्याबरोबर बदामाची बर्फी झाली, आतां इतक्यांत दूध शंकरपाळे झाले—

**रागिणी**—झाले, झाले ! माझं मीं खाल्लं त्यांत तुझं ग सटवे काय गेलं ? खरचतं धन्याचं आणि गरजतं कोठावळ्याचं ! मीं खाल्लं म्हणून का तुझं पोट दुखायला लागून पडली होतीस मेल्यासारखी ! मुलुखाची आळशी. जेवण तयार नसेलच अजून ? भुकेनं माझी मरायची वेळ आली तरी—

**गर्गशा**—पुरे झालीं असलीं बोलणीं ! माझे जेवण केंव्हांच तयार आहे.

**रागिणी**—तयार आहे ना? ते आले नाहींत मग केलंस कशाला इतक्या लवकर?

**गर्गशा**—आपल्याचकरितां! आज यायला जरा उशीर होईल असं यजमान जातांनाच मला सांगून गेले आहेत.

**रागिणी**—होय ना? आज ते करायचेच उशीर! पोरीच्या लग्नासंबंधीं कांहीं बोलूं म्हणून लवकर या म्हटलं; तर उलट उशीरानं येईन म्हणून सांगून गेले आणि तेसुद्धां तुझ्याजवळ! मी कोण त्यांची? नकोरे नको देवा हें बायकांचं जिणं! कुणाचं होऊं नये चाकर आणि कुणाची होऊं नये बाईल! यापुढं जी नवऱ्याची बायको होईल ती शेण खाईल! काय ग, वाढतेस ना माझं पान? वाढ, वाढ लवकर. (तिच्या अंगावर जाते.)

**रागोपंत**—(पुढें येऊन व तिला अडवून) हां! एवढं काय झालं तिच्यावर घरघरायला?

**गर्गशा**—आणि बाईसाहेब, ताईसाहेबांच्या लग्नासंबंधानं तुम्हाला बोलायचं होतं ना कांहीं?

**रागोपंत**—काय बोलणार! अहोरात्र भांडतांना त्यांना एखादी लग्नाची मुलगी आहे हें ह्यांच्या ध्यानीं मनीं असेल तर ना? छे, छे, छे! पोरीची सारखी हेळसांड चालली आहे!

**रागिणी**—खरंच तें. (डोळ्यांला पदर लावून) एव्हांपर्यंत पोरीला एखादं पोरसुद्धां व्हायचं. पण तुमचं लक्ष आहे कुठं? तिला तुम्हीं कांहीं गृहशिक्षण दिलं आहे, का कांहीं शिस्त लाविली आहे?

**रागोपंत**—गृहशिक्षण देणार तुम्ही कीं मी?

**रागिणी**—घरांत मी वागतें तसं वागायला न समजण्याइतकी, काटा आता लहान का आहे? पण तिच्या लग्नाची खटपट पुरुषांनींच करायची ना?

**रागोपंत**—तिला आपलं वळण लागलेलं, तेव्हां आमच्या खटपटीचा उपयोग होतो कुठं! आपलं खडाष्टक जगजाहीर झालं आहे; त्यामुळं तिला पहायला आधीं कुणी फारसा येत नाहीं; कुणी एखादा चुकून माकून आलाच तर ह्या दिवटीच्या प्रकाशानें तोही बिचकून जातो. हं! वर्तमानपत्रांत 'वर पाहिजे' म्हणून दिली आहे जाहिरात. पुढं जसं होईल तसं होईल!

**रागिणी**—इश्श! असे काय अगदीं हातपाय गाळायचे ते! साडेअकरा

वाजले; जरा लवकर आलां असतां तर नसती का घटकाभर वाटाघाट केली लग्नाची ? पण रोज उठून अस्सा उशीर करायचा आणि मग माझ्या जिवाचा संताप झाला–पित्त उठलं आणि फुटलं ग बाई माझं कपाळ ! ए अवदसे, हजारदां सांगितलं ना तुला माझं पान वाढ म्हणून ! तरी आपली ठोंब्यासारखी उभी ! काय, काय, काय ग ! ( जवळ अंगावर जातां ) ऐकत उभी राहिलीस !

**रागोपंत**—( तिला आवरून ) किती वेळां बरं तुम्हाला सांगितलं ! आधींच अतांशा चाकरमाणसं मिळत नाहींत आणि मिळालीं तर त्यांना वागवून घेण्याची तुमची चाल नाहीं.

**रागिणी**—मला चाल नाहीं का ? आणि हीं तुमचीं नोकरमाणसं मोठीं सुधीं ! आणि नोकरांच्या देखत बायकोला बोलायची ही तुमची तरी चाल कुठली ?

**गंगेशा**—( जातां जातां–स्वगत ) बाहेरनं आले नाहींत तों कामं राहिलीं बाजूला आणि झाली दोघांची तोंडमुलाखत सुरू ! चालेल प्रहरभर ! तोंवर खुशाल एक झोंप काढावी ! वारे यजमान आणि यजमानीण ! खासा जोडा !

[ मान डोलवीत जाते.

**रागिणी**—( हुंदके देत ) आपण उशीर करून घरीं यायचं आणि चाकरमाणसांदेखत दुसऱ्याला चाल नाहीं म्हणायचं !

**रागोपंत**—पण, तूं एवढी रागावलीस तो मला असा उशीर झाला आहे तरी किती ? सारे साडेदहा वाजले असतील !

**रागिणी**—छेः ! आठांचा सुमार असेल आतां ! तरी बरं, जवळ घड्याळ ! चांगले साडेअकरा वाजून गेले आणि म्हणायचं साडेदहा वाजले असतील.

**रागोपंत**—मीं साडेदहा म्हटलं म्हणजे तूं म्हणायचंच साडेअकरा ! घड्याळांत किती वाजले, इतकी क्षुल्लक गोष्ट; पण त्यांतही तुझा आग्रह हा आहेच!

**रागिणी**—मी तरी तेंच म्हणतें ! घड्याळांत मेले वाजायचे तितकेच वाजतात ! पण तुम्हांलाच मुळीं दुराग्रहाची संवय, त्याला काय करणार ?

**रागोपंत**—हें पहा, माझ्या खिशांत घड्याळ आहे.

**रागिणी**—असेल ! अलीकडे साऱ्यांच्या खिशांत घड्याळं असतात; पण तीं करायचीं काय पाहून ? साडेअकराच वाजले आतां. माझा अदमास कधीं चुकायचा नाहीं !

**रागोपंत**—नेहमीं चुकतो म्हणून बरं. माझा बरीक अगदीं बरोबर असतो. साडेदहाच वाजले आतां!

**गौरी**—( प्रवेश करून व मनगटावरील घड्याळ दाखवीत ) बाई, बाई, बाई! आई, बाबा, तुमच्या अदमासाला कांहीं अंदाज तरी! हें पाहिलंत का! बरोबर अकरा वाजले. भूक लागली. जेवायला उशीर झाला! अकरा वाजले आई!

**रागिणी**—अगदीं वेळेवर येऊन पडलीस दोघांच्या मधें! त्यांचे साडे-दहा वाजले, माझे साडेअकरा वाजले, आणि ह्याच वेळेला तुझेच ग कसे अकरा वाजले! उर्मट कारटी कुठली!

**गौरी**—मग काय, साऱ्यांचेच बारा वाजले म्हणूं!

**रागोपंत**—पाहिलंस! ह्या-ह्या-ह्या असल्या गुणांनींच तुझ्या लग्नाचे नेहमीं बारा वाजतात ते! हजार वेळां तुला सांगितलं, मोठ्या माणसांमध्यें लहानांनीं पडूं नये. जा. हो चालती इथून.

**रागिणी**—आणि काय ग, इतक्या लवकर भुकेनं व्याकुळ झालीस ती सकाळपासून उपाशी का आहेस तूं! चहा माझ्या आधींच, शिवाय माझ्या-बरोबर दूध, शंकरपाळे, चांगल्या पसाभर बदामाच्या वड्यासुद्धां गिळल्यास—

**गौरी**—पण आई, भूक लागली म्हणून तुझंच ना पित्त इतका वेळ अडकलं होतं! जेवायला उशीर झाला, म्हणून भांडायचं आणि भांडण्यांत वेळ गेला म्हणून जेवायला उशीर करायचा; हें ग काय हें!

**रागिणी**—गप्प बस कारटे! त्यांच्या समक्ष मला मूर्ख ठरवतेस, होय!

**रागोपंत**—ती आहेच तशी! भलत्याच ठिकाणीं खरं सांगायची खोडच आहे तिला. माझ्यासंबंधानेंही केव्हां केव्हां असंच भलतंसलतं बोलत असते.

**गौरी**—मग खोटं का बोलतें मी! अकरा वाजलेले चांगले अर्धातास दिसत आहेत आणि बाबा, तुम्ही आपला साडेदहाचा आग्रह धरून बसलांत.

**रागिणी**—एवढ्या तेवढ्या कारणावरून वितंडवाद घालायची संवयच आहे हो त्यांना.

**रागोपंत**—मी एवढ्यातेवढ्या कारणावरून तरी वितंडवाद घालतों. पण तूं!—मुळीं कांहीं कारण नसतांनाच वितंडवाद घालीत बसतेस! भांडखोर कुठली

**रागिणी**—तर तर ! भांड भांड भांडायचं आपण आणि भांडखोर म्हणून नांवं ठेवायचीं दुसऱ्याला.

**रागोपंत**—उगीच नाहीं नांवं ठेवीत. हेंच पहा, इतका वेळ तूं सारखी भांडते आहेस; पण लहान मुलांसमक्ष भांडायचं म्हणजे त्यांना वाईट वळण लागतं म्हणून एक तरी भांडणाचा शब्द मीं काढला का ?

**रागिणी**—आणि अंबाबाईची शपथ, तूंच सांग गौरी, आल्यापासून दोन तास हे सारखे भांडत आहेत; पण पोरीचं गृहशिक्षण बिघडेल म्हणून माझ्या तोंडून भांडणाचा शब्द चुकून तरी निघाला का ? बाहेरून यायला थोडा उशीर होईल म्हणून सांगून जायचं तेंसुद्धां मला नाहीं; त्या मेल्या गर्गशेला ! पण म्हटलं जाऊं द्या; उगीच भांडण कशाला ? हो, मला सांगायला मी आहें कोण त्यांची ? त्यांचं माझं कांहीं नातं का गोतं ? पण म्हटलं मी होतेंना घरांत चांगली जिवंत !

**रागोपंत**—पण मी नऊ वाजतां बाहेर गेलों तेव्हां बाईसाहेबांची झोंप चालली होती ना !

**रागिणी**—मग काय करूं ? लवकर उठून तरी भांडतच बसायचं कीं नाहीं ! झोंपेंत काय काळ जाईल तेवढीच काय ती साऱ्या दिवसांत माझ्या तोंडाला विश्रांति. तशांत आणखी या पोरीच्या लग्नाची काळजी !

**रागोपंत**—म्हणूनच इतक्या उशिरापर्यंत अगदीं स्वस्थ झोंप लागली हो !

**रागिणी**—पोरीनं कशी जिवाची छळणूक चालविली आहे !

**गौरी**—आयायायाई ! माझ्या लग्नाच्या काळजीमुळं अगदीं वाळून गेली हो माझी आई ! आई, माझ्या लग्नाची तूं खंत करूं नको बरं ! एकुलत्या एक मुलीचं लग्न, लग्न तें काय मोठं ? कुणींच केलं नाहीं तर माझं मीच आपलं मांडीन स्वयंवर ! आणि तेंही करायला कुणी वीर धजला नाहींच तर आहेच आपला वक्रतुंड-आपल्या हातांतलाच आहे तो ! जबरदस्ती करून यालाच मी आपली माळ घालीन हो !

**रागिणी**—ती कां ? तुझ्या आईनं कांहीं बांगड्या भरल्या नाहींत म्हटलं !

**गौरी**—कांहीं नकोस तूं !

**रागोपंत**—पण मी आहें ना ?

**गौरी**—हो, माझे बाबा करतील माझं लग्न !

**रागिणी**—म्हणे, 'बाबा करतील माझं लग्न !' करतील लग्न तर देतील पाहून कुणी तरी असाच कीं बसेल तो साऱ्या जन्मभर भांडत ! आणि काय ग, ते तुझे आणि मी कांहीं तुझी आई नव्हे ?

**रागोपंत**—परमेश्वराला ठाऊक तूंच तिची आई आहेस का नाहींस !

**रागिणी**—मग तुम्ही का आलां होतां पोरटीचा भार नऊ महिने पोटांत बाळगून तिला जन्म द्यायला ? तरी बरं, पोरीपायीं चांगली चार महिने अंथरुणाला अगदीं खिळून होतें !

**रागोपंत**—त्याची येवढी बढाई कशाला तुझी ? मी आई असतों तर चारच काय, पोरीसाठीं सहा महिने खस्ता खाल्ल्या असत्या !

**गौरी**—हो, सहा वर्षेसुद्धां बाबांनीं माझ्यासाठीं खस्ता खाल्ल्या असत्या ! आई, तूं नको काळजी करूं ! बाबा करतील माझी सर्व काळजी !

**रागोपंत**—बाबा तुझं लग्नसुद्धां करतील; पण तूं पडलीस मोठी सुधी. पहायला आलेल्याशींसुद्धां भांडतेस !

**रागिणी**—पूर्वीचा मुका विनय नाहीं, हल्लींचा बोलका शहाणपणा नाहीं; अशी कशी तूं तोंडाची नुसती फटकळ ?

**गौरी**—त्याला मी काय करूं ? जन्मस्वभाव हा कांहीं माझा दोष नव्हे.

**रागोपंत**—खरंच आहे, खाण तशी माती—

**रागिणी**—नव्हे, नव्हे ! बाप तशी बेटी आणि कुंभार तशी लोटी ! तोंडाळपणामुळं लग्न झाल्यानंतर लग्न मोडण्यापेक्षां तें होण्यापूर्वीच मोडलेलं काय वाईट ? लग्न म्हणजे शिवसंभवाचं नाटक—

**गौरी**—फरक इतकाच कीं, प्रेक्षकांपेक्षां तें नायक-नायिकेलाच अधिक आवडलं पाहिजे. तशी वेळ आली म्हणजेच करीन मी लग्न. त्याबद्दल तुमचं कशाला भांडण उगीच ?

**रागोपंत**—वा, कसं मिळालं आहे कन्येला गृहशिक्षण ! ह्याकरितांच आतां ह्यापुढं तुला स्थळ म्हणून पहायचं नाहीं. श्रम केले ते वायां गेले, तूंही झाली आहेस मोठी तोंडबाज ! काढ आतां तुझा तूंच नवरा शोधून ! दिवटी पोर ! पुष्कळ पाहिल्या फटकळ पोरी; पण पाहुण्यांशीं, हिला पहायला आलेल्यांशीं, —वडिलांशीं सुद्धां वितंडवाद घालणारा कारटीचा हा बेमुर्वत मासला कांहीं और

आहे ! पोर इतकी अमर्याद व्हायला कारण तूं ! जरा तिच्याकडे लक्ष देतीस, तर बापाशीं इतकी अमर्याद कशी झाली असती ? शिव ! शिव ! असल्या घरांत राहण्यापेक्षां एखाद्या वेडखान्यांतसुद्धां जाणं बरं !

**रागिणी**—वाटत असेल तर खुशाल जावं तिकडे. दाराशीं गेल्याबरोबर खात्रीनं आंत घेतील हो !

**रागोपंत**—हा चाललोंच मी आतांचे आतां निघून ! तूं घालवायलाच बसली आहेस मला आणि गौरीला मुळीं बापाची जरूरच राहिली नाहीं. मग रहायचं कुणासाठीं ? या घरांत आतां अन्नसुद्धां घ्यायचं नाहीं ! तुझा भुकेनं—प्राण गेला, माझ्या प्राणाची भूक गेली. रजा घेतली तेव्हां चारआठ दिवसांत भांडखेड्याला येतों म्हणून वारोपंताला लिहिलं होतं. बस्स ! आतांच्या आतां निघतों. बायको, बायको—कसली ही बायको !

**रागिणी**—नवरे—नवरे—बायकोला सोडून जाणारे हे कसले नवरे ! ( स्वगत ) पण मी बरी जाऊन देईन यांना एकटयाला ! जातें आणि करून ठेवतें मी पण आपली तयारी. [ जाते. रागोपंत विचार करीत फिरतो.

**गौरी**—बाई ! पोरी, गौरी, तुला भूक, भूक; आतां कसली भूक ! आई गेली इकडे बाबा जाणार तिकडे, मी कुणीकडे ? इकडे ना तिकडे-जावं झालं जेवायला मैत्रिणीकडे ! ( जातां जातां स्वगत ) इतकं भांडण झालं त्याला कारण काय होतं आणि त्यांतून सार काय निघालं ?—खरं पाहूं गेलं तर ना बूड ना शेंडा ! नुसता मुखरसाचा लोंढा ! त्यांत वहातां वहातां हीं माझं लग्न करणार आणि मला नवरा पाहून देणार ! दिलाच तर स्वतःसारखा भांडखोर ! छेः ! यांनीं पसंत केलेला मी मुळींच मान्य करायची नाहीं. माझा मलाच चांगला पाहून घेतला पाहिजे. [ जाते.

**रागोपंत**—वक्रतुंड ! अरे वक्रतुंड ! ए वक्रतुंड्या ! आलास का इकडे ! सेवेला वेळेवर हजर असेल तर तो नोकर कसला ? हा मी धनी आणि ही आमची घरधनीण—नोकरांचं कां फावणार नाहीं ?—कशाला तो संसार थाऱ्याला राहील आणि कसं हें घर खायला उठणार नाहीं ! 'भांडण लागलं घरादारा, संसाराचा बोजवारा !' इतक्या हांका मारल्या, अजून या वक्रतुंडयाचा पत्ता नाहीं ! वक्रतुंडया, ए वक्रतुंडया—

**वक्रतुंड**—( धाबळी नेसलेला-खांद्यावर फडकें-डाव्या हातांत पळीपंचपात्री आणि उजव्या हातांत गंधाक्षता, फुलें घेतलीं आहेत असा प्रवेश करून ) 'यान्तु देवगणाः सर्वे पुनरागमनाय च'. ( फुलें अक्षता रागोपंताच्या हातीं देतो तों रागोपंत त्याच्याच अंगावर टाकतांना ) 'मंत्रपुष्पांजलिं समर्पयामि'.

**रागोपंत**—गाढवा, इतक्या हांका मारल्या, होतास कुठं ? मी गांवाला जायचा-अक्कल नाहीं तुला-माझी तयारी करायची ?

**वक्रतुंड**—यजमान पुन्हा एकाएकीं बहिर्गमन करणार ?

**रागोपंत**—गध्या, नाहीं ! गांवाला चाललों आहें.

**वक्रतुंड**—पुनरागमनाय कीं नितांत गमनाय ? तयारी ती प्रस्थानसिद्धता कीं अंत्यविधिसामुग्री ? अद्वितीय यजमानांची कीं वहिनीबाईसह द्वंद्वाची तयारी !

**रागोपंत**—बस् कर तुझा संस्कृत शहाणपणा आणि थोडंसं फराळाचं घाल आणि माझी एकट्याची पेटी तयार कर.

**वक्रतुंड**—म्हणजे ! वहिनींचा उत्सर्ग करून यजमान अद्वितीयच लंबायमान होणार ? हा केवळ ब्राह्मण्याचा प्रलय आहे. हो, ब्रह्मदेवाची जी प्रजोत्पादना शक्ति तें ब्राह्मण्य. हा ब्रह्मसंबंध आहे. हें ब्रह्मचर्य आहे. हें नाहींसें झाल्याशिवाय का दंपति परस्परांचा विवाह करतील ? तें ब्राह्मण्य यायला दूर जायला नको यजमान.

**रागोपंत**—बरं, बरं ! पेटी तयार कर आणि झट्कन् गाडी घेऊन ये पाहूं.

**वक्रतुंड**—उन्मीलित शकट आणूं कीं अवगुंठनवती शिबिका आणूं ? तुमचं शीर्ष बोडकं, तेव्हां अवगुंठनवती शिबिकाच बरी.

**रागोपंत**—मूर्खा, माझी कोट-पगडीही घेऊन ये.

**वक्रतुंड**—अंगवस्त्रासुद्धां ? आणि बरोबर द्यायला घरांत पार्थिकेय शिल्लक नाहीं. वहिनीबाईनीं सकाळींच त्याची पूर्णाहुति घेतली.

**रागोपंत**—थांब, गाढवा ! तुझं गीर्वाण भाषेचं अजीर्ण कायमचं मोडून टाकतों. ( पोटावर मारतो-तो जातो.) कुठं जायला निघालं तर बरोबर थोडंसं फराळाचं द्यायलासुद्धां घरांत नाहीं, हें माझं विवाहसुख ! आतां गेलों कीं चांगला दोन महिने परत येतच नाहीं. म्हणजे थोडा स्वस्थपणा सांपडून संसारांत आपण

शहाणे कीं मूर्ख ह्याचा विचार करायला अवसर मिळेल आणि निदान दोन महिने तरी सुटेन या कैदाशिणीच्या हातून !

**रागिणी**—( न बांधलेलें लुगड्याचें गांठोडें हातांत घेतलेल्या वक्रतुंडासह घाईनें प्रवेश करून ) पण, मी बरी जाऊं देईन अशी मला सोडून ! काहीं फुकाची नाहीं आलें ! आज घरांत सोडलीत, उद्यां नको म्हणून कमिटीच्या कचऱ्याच्या पेटींत टाकून द्याल !

**रागोपंत**—आणलेस बांधून कपडे ? पाहूं काय काय घेतले आहेस ते ! सुटे पदर हातांतले सोडून गांठोडें पुढें ठेवतो ) हें रे काय गध्या !

**वक्रतुंड**—ही वहिनीबाईंची गठडी ! सहगमन करूं म्हणतात !

**रागोपंत**—चल ! दे फेंकून ती तिकडे. तुला कुणीं पंचाईत सांगितली होती आणायची ?

**वक्रतुंड**—वहिनीबाईनीं ! मोठया मानिनी त्या ! त्यांनीं गतभर्तृका होण्याचं साफ अमान्य केलं, आणि मला सवस्त्र करून इथं आणलं ! वहिनी-बाई मोठ्या सौभाग्यवती आहेत. त्या ब्राह्मण्याचा प्रळय होऊं देणार नाहींत सहगमन करतील.

**रागोपंत**—उचल म्हणतोंना तीं लुगडीं ! माझे कपडे बांध आणि गाडी घेऊन ये. जा, नीघ. ( तो कांकूं करतो, सबब स्वतःच उचलूं लागतो.)

**रागिणी**—( त्याच्यावर पाय ठेवून ) बरीं आहेत तिथंच. घर सोडून जायचं म्हणजे भागूबाईपणा, त्याला लुगडींच चांगलीं शोभतात !

**रागोपंत**—याचा अर्थ काय ? मी गांवाला निघालों—

**रागिणी**—मीही आपल्याबरोबर निघालें.

**रागोपंत**—म्हणजे ? चार दिवस परगांवींसुद्धां मला स्वास्थ्य मिळूं द्यायचं नाहीं ?

**रागिणी**—प्रकृतीचं स्वास्थ्य बिघडायला इथं घरांत काय रोग उद्भवले आहेत ?

**रागोपंत**—तूंच मूर्तिमंत आहेस. माझ्या जीविताला तूं नळाश्रित वाता-सारखी झाली आहेस. कितीही उपाय करा; जायचा नाहीं आणि त्रास बरीक सततचा !

**रागिणी**—आणि तुम्हांला मीं माझा संधिवात म्हटलं म्हणजे खंडीभर रागवाल तेवढे! चारी बाजूंनीं घरांत कसं अगदीं जखडल्यासारखं झालं आहे मला—

**रागोपंत**—ए गध्या! माझे कपडे बांधून गाडी आण म्हणून सांगितलं ना तुला?

**वक्रतुंड**—सांप्रत वहिनीबाईनींच मला आपला गर्दभ केलं आहे त्याला किं करोमि!

**रागोपंत**—स्वार होऊन तुला चाबकानंच फोडला पाहिजे. नोकरसुद्धां किती उर्मट! (अंगावर जातो. तो पळतो.) नको, संसार नको! जीवसुद्धां नकोसा झाला मला!

**रागिणी**—जीव नकोसा व्हायला काय झालं? मला सारं समजतं हो! मी बरीक नकोशी झालें आहें खरी! हो, मी आज मेलें तरी उद्यां दुसरी कराल!

**रागोपंत**—त्याचं नांवच नको. पहिलीं पांच सात वर्षं पूर्ण विश्रांति आणि पुढें लग्नाचा विचार आलाच तर या लग्नाच्या आठवणीनं जीव द्यायची तयारी!

**रागिणी**—हो! माझ्यासाठीं तुम्हीं जीव देण्याइतकं आहे कुठं माझं भाग्य! येवढंसं गांवाला जायचं तर तेव्हांसुद्धां घेत नाहीं मला बरोबर! आणि म्हणे जीव देतों!

**रागोपंत**—तूं नकोस म्हणून तर मला गांवाला जायचं!

**रागिणी**—पण मी कशी एकट्याला जाऊं देईन? सुईमागं दोरा असायचाच!

**रागोपंत**—दोरा तुटला, सुई मोडली! एकटाच जाणार मी; कपडेसुद्धां नकोत. असाच जातों निघून. [जाऊं लागतो. तोंच समोर **वक्रतुंड** येतो.

**वक्रतुंड**—उपवनद्वारीं शकट येऊन उपस्थित झालं आहे. आगंतुक आले ही यजमानांच्या प्रस्थापनाला चांगली शकुनवंती आहे.

**रागोपंत**—खरंच आली का गाडी? चल तर लौकर. केव्हां एकदां इथून निघेनसं झालं आहे. टाक कुठले तरी चार कपडे आंत.

**वक्रतुंड**—(वक्रतुंडाच्या हातांत रागिणी लुगड्यांचें बोचकें देते तें घेऊन) हेंच टाकूं का!

**रागिणी**—हो, हेंच टाक नेऊन गार्डीत. चल.

**रागोपंत**—टाक नेऊन तें चुलींत. गार्डीत ठेवलंस तर खबरदार! वक्रतुंडाच्या अंगावर जातो. तो पळतो. पुढें रागोपंत मागें रागिणी घाईनें जाऊं लागतात तोंच समोर **वारोपंत** आणि **वारूबाई** प्रवेश करतात. दोघांचा खेडवळ पण सांठवणीचा पोषाख असतो. साश्चर्य आणि कोंपरापासून हात जोडून] कोण? वारोपंत? आलास! मोठे उपकार केलेस बाबा! शाबास. संकष्टीच्या घरीं एकादशी! अगदीं कोंपरापासून नमस्कार असो तुला! संधि साधून अगदीं ह्याच वेळीं कसा रे सैतानासारखा समोर उभा राहिलास?

**वारोपंत**—सैतानासारखा!

**रागोपंत**—सैतानासारखा नव्हे तर काय? घराला कंटाळलों म्हणून आगाऊ पत्र लिहून तुझ्याकडे मी यायला निघालों; पण तूं कसला वस्ताद! इथंच येऊन मला पछाडलंस! ये बाबा; ये हो! तूंही आलीस वहिनी! बरोबर कुणी आणखी शेंपन्नास वऱ्हाडी! हो, लग्नपत्रिकाच पाठविली होती मीं!

**वारोपंत**—अरे, तूं रागानं बायकोला सोडणार म्हणून तुझ्या आणि गौरीचं कुठं जमत नाहीं म्हणून तिच्या, एकंदरींत हा तुम्हां दोघांच्या लग्नाचा सोहळाच नव्हे का? मला पडली काळजी! म्हटलं, जाऊं आणि देऊं यांचं नीट करून.

**रागिणी**—कोण कुणाला नीट करणार, देव जाणे! फडकंही मळकं अन् मडकंही मळकं! एकानं दुसऱ्याला नीट करायला जावं तर फडक्याचा मळ म-क्याला आणि मडक्याचा मळ फडक्याला!

**वारोपंत**—लग्नांत कीं नाहीं वहिनी, रंगवावींच लागतात दोन्ही! कवीश्वराला सुद्धां आणला आहे बरोबर.

**रागोपंत**—होय ना? खराखुराच सांपडलों म्हणायचा साऱ्यांच्या तडाक्यांत. नाक्यावरचा चावी नसलेला वहाता नळच मी; वाटेल त्यानं यावं आणि हात धुऊन घ्यावेत!

**वारोपंत**—वा! रागोपंत मोठा सभ्यच दिसतोस मला! जीवश्चकंठश्च स्नेही म्हणून पदरमोड करून मुद्दाम भेटायला आलों तर चांगलं चालविलं हेस स्वागत!

**वारूबाई**—पाहिलंत ! मी तिथंच सांगत होतें, 'येत आहेत तर येऊंदे भाऊजींनाच भांडखेप्याला', पण मेला स्वभावच असा तऱ्हेवाईक ! माझंच नशीब खोटं; एरवीं हे सारे सोहाळे कसे होतील ? चला, आलों तशीं ह्याच पावलीं आपण आपलीं परत जाऊं.

**रागिणी**—कशाला ? मला ठाऊक आहे. पहिल्यापासून भाऊजींचा असाच अगदीं चिक्कट स्वभाव ! चार दिवस जाऊन हे रहाते तर डबोल्यांत तेवढा खड्डा पडला असताना !

**रागोपंत**—चूप रहा, तुला काय जरूर उगीच मधें तोंड घालायची ! कुणी आलं तर तेवढ्यापुरता तरी जिभेला जरा आळा घालावा.

**रागिणी**—म्हणजे ? इतक्या वेळ इथं तोंड सुटलं होतं तें माझंच का ? आपणच प्रथम त्यांना असल्या स्वागताचे दिवे ओंवाळायला सरसावलांत. मी काय, अर्धांगी; अधिकारानं नुसता हाताला हात लावला—

**वारूबाई**—म्हणून कांहीं त्यांच्यावर असं तोंड नाहीं टाकायचं ! तुम्हीच देतां भाऊजी बायकोला मनसोक्त वागायला परवानगी, दुसरं काय !

**वारोपंत**—तूं लागलीस का मधें चोंबडेपणा करायला ? घरकोंबड्या आणि सदा चोंबड्या !

**रागोपंत**—वारोपंत, अरे तूं काय लागतोस त्या बायकांच्या तोंडीं ! कितीही सांगितलंस तरी त्यांची समजूत म्हणून पटायची नाहीं. ह्यालाच मी कंटाळलों म्हणून तर मला घर सोडायची पाळी आली.

**वारोपंत**—म्हणजेच तूं दीडशहाणा ! भांडणं झालीं म्हणून घर का सोडतात कुणी ? रागोपंत, संसार हा एक व्यापार आहे. त्यांत तेजीमंदीनं व्यवहार करणाराच कांहीं तरी टिकेल; सट्टेबाज केव्हांना केव्हां उखडलाच पाहिजे.

**रागिणी**—शिकवा; भाऊजी, असाच इकडे थोडा शहाणपणा शिकवा, आणि विचारा कोण, ते रागीट का मी रागीट ? मी म्हणाल तर तोंडांतून एक अवाक्षर काढीत नाहीं हो !

**वारोपंत**—पहातोंच आहें मी !

**रागिणी**—तरी भांडखोर आपली मीच ! हो, लग्न लावून बायको झालें आहेंना नवऱ्याची !

**वारूबाई**—तुम्हांलाच काय रागिणीबाई ! लग्नाचा आणि रागीट स्वभावाचा अनुभव साऱ्यांना येतो ! घरोघर मातीच्याच चुली आणि मातीचेच बैल ! पण बाई तुमचं पाहिलं तें आपलं जगावेगळंच ! प्रत्यक्ष नवऱ्याला घर सोडायची पाळी आणलीस भगवती !

**रागिणी**—माझा नवरा अजून घरींच आहे हो सौभाग्यवती ! घर सोडून आला तो तुमचाच. त्याला घाला आधीं घरांत आणि मग काढा बरं माझी वरात ! मोठी आली आहे उपदेश करायला ! नवऱ्यासमोर चुरुचुरु बोलतेस ! जिभेला आळा घालायला तिथं मामंजी नाहींत. वाटतं घरांत ? ( स्नान केलेला—पंचा नेसून व हातांत पळी-पंचपात्री घेऊन येत असलेला **कर्कशराव** पाहून ) अगबाई !

**कर्कशराव**—( प्रवेश करून ) धर्मक्षेत्रे कुरुक्षेत्रे समवेता युयुत्सवः । मामकाः पांडवाश्चैव किमकुर्वत संजय ।

**वारोपंत**—भवान्भीष्मश्च-हा रे कोण उपटसूळ, रागोपंत ?

**रागिणी**—हाच म्हातारा मघांशीं बागेंत होता. जा म्हणून सांगितलं तरी जाईनाच मेला !

**रागोपंत**—कोण, बाबा ? ( नमस्कार करतो.)

**कर्कशराव**—शतायुषी भव ! काय रे ! मी तुझा बापुस यायचा; ठेशनावर आला असतास तर काय पाय मोडले असते तुझे ?

**रागोपंत**—पण बाबा तुम्हीं पत्रांत—

**कर्कशराव**—लिहिलें नव्हतें का तुला कीं चार सहा दिवसांत येतों म्हणून ! मग कां नाहीं आलास ठेशनवर ?

**वारोपंत**—अहो, पण त्यांत नेमकी वेळ आणि गाडी लिहिली होतीत का ? का रागोपंतानं चार सहा दिवस जाऊन बसायचं स्टेशनावर ?

**कर्कशराव**—राग्या, हा रे कोण तुझा कड घेणारा !

**रागोपंत**—हे माझे स्नेही वारोपंत चिकटे ! आतां इतक्यांत गांवाहून आले.

**कर्कशराव**—रांडेचांनों ! मग सगळीं भांडतां काय ? पाहुणीं आलीं त्यांची हीच का उठबस ? तीं पण बघतों तो तुमचाच मसुदा. मघांपासून बघतों; गाढवीचीं सारींजणें जशीं कोल्हीं जमलीं आहेत मणसवटींत ! काय पण साऱ्यांचीं तोंडें, शेणाच्या गायऱ्हा जशा ! द्रुपदो द्रौपदेयाश्च शंखान् दध्मु पृथक् पृथक् ।

आणि काय गों, तुम्ही कोण बायका का ब्रेस्वा ?—तुमचा बाप पुढें आला तरी अमर्यादपणानें अजून इथंच उभ्या ! ए, ए, बैलोबांनों, ही तुमची घरची शिस्त वाटतें ? आणि कायरे ती तुझी पोरगी, कुठें आहे ती ? मघां पाहिली तों तिलासुद्धां चाल ना रीत ! मग कशाला होईल तिचें लगीन ! ए, ए, चला व्हा आंतल्या घरांत ! पहा, पहा. चालल्या आहेत पहा कशा ! म्हशी कुठल्या !

**रागोपंत**—चला, बाबा वर दिवाणखान्यांत चला—

**कर्कशराव**—दिवाण्या, मला काय करायचा आहे तुझा दिवाणखाना माझ्या आधीं त्या पाहुण्यांची व्यवस्था कर. मला काय ! भाताचे चार पिंड खाईन आणि राहीन आपला इथेंच दाराशीं मढ्यासारखा पडून ! माझा गीतापाठ पुरा व्हायचा आहे. खबरदार ! आतां भांडून मला कुणी कटकट कराल तर !

[ जातो.

**रागोपंत**—पाहुण्यांची व्यवस्था, तिच्याकडून मघांशीं झालेल्या स्वागतावरून घरांत कशी होणार हें दिसतंच आहे ! छेः ! छेः ! घरांतली घाण बाहेर उघडी करून ती किती आहे याचंच लोकांसमोर-या परक्या पाहुण्यासमोर-प्रदर्शन करायचं कीं नाहीं ? नको तें. तिच्यापायीं पाहुण्याजवळ घरची अब्रू जाण्याचा एखादवेळीं प्रसंग यायचा, आणि तोही आतां बाबांच्या समक्ष. त्यापेक्षां पाहुण्यांची व्यवस्था चार पावलं दूर झालेली बरी! वक्रतुंड, ए वक्रतुंड; [**वक्रतुंड** प्रवेश करतो त्यास ] वक्रतुंड, ह्या किल्ल्या घे आणि तें आपलं शांतिसदन उघडून पाहुण्यांची तिथं नीट व्यवस्था कर.

**वारोपंत**—कां रे रागोपंत, बंगलींत रे कां माझी व्यवस्था ?

**रागोपंत**—हें पहा वारोपंत, वहिनींचं आणि हिचं घरांत कसं काय पटेल, हें तुला आतांच दिसलं आहे. त्यांत आजच आलेले बाबा ! त्यांचा अवतार तूं पाहिलासच !

**रागिणी**—( सक्रोध प्रवेश करून ) तो अवतार कितीही कडक असला तरी हें काय, पाहुणे घरीं आले तर त्यांची व्यवस्था दुसरीकडे करण्यानं गृहिणी या दृष्टीनं माझी शोभा होते. तुम्हांला काय ? साऱ्यांना कमीपणा येतो ! मी नाहीं असं करूं द्यायची. आणि मामंजींनाही कांहीं भांडणाचं वावडं दिसत नाहीं. पहिली ती साऱ्यांवर ताण आहे !

**रागोपंत**—चूप! तुला कांहीं मर्यादा आहे कीं नाहीं? हे लांब रहातील तितकं तुझ्या चुरचुऱ्या जिभेला भांडायला कमी मिळेल.

**रागिणी**—म्हणून म्हणतें, कीं पाहुण्यांची व्यवस्था घरांतच झाली पाहिजे.

**रागोपंत**—होणार नाहीं—

**रागिणी**—अस्सं! मामंजी आले म्हणून का? बरं! बरं! पाहून घेईन!

[ दांतओंठ खात निघून जाते.

**रागोपंत**—यासाठींच मी म्हणतों तुम्ही आपलीं चार पावलं लांब असलेलीं बरीं. वक्रतुंड, हे घे पैसे आणि यांना तिकडे काय हवं नको तें नीट पहा.

**वारोपंत**—एकूण बंगालच्या घरीं कंगाल गेलं, सारा दिवस भुकेनं मेलं! ठीक आहे. प्रसंग आला म्हणजे पाहून घेईन. ए, ए! तूं तरी कशाला हवास रे! आण इकडे ते रुपये. मीच करतों माझी व्यवस्था.

[ पैसे हिसकावून घेतो, तों **कवीश्वर** प्रवेश करतो.]

**कवीश्वर**—हां! हां! बाबा, हें काय? ( वारोपंताचा हात मागें करतो. कांहीं रुपये खालीं पडतात.) पैसे कशाचे घेतां?

**वारोपंत**—तुझ्या मूर्खपणाची किंमत! हवा खायला आलासना तूं! कुणी म्हणून कोणतीही गोष्ट सरळ म्हणून होऊं देऊं नका! तूंच एक कमी होतास भांडखोरांच्या टोळींत, तो बरा आलास. तुझ्या काकांना नमस्कार कर.

[ त्याप्रमाणें करतो. वारोपंत पडलेले रुपये घेतो.

**रागोपंत**—चिरंजीव हो! यंदां बी. ए. झालासना? आतां लवकरच तुझं लग्न केलं पाहिजे! पण काय रे, इतका वेळ कुठं होतास तूं?

**कवीश्वर**—होतों जवळच पलीकडे. मोठ्या माणसांत लहानांनीं कशाला पडावं! म्हणून लांबूनच पहात होतों सारं! पण काका, तुम्हीं हे रुपये दिलेले कांहीं पहावत नाहींत. कशाला ते?

**वारोपंत**—खर्चाकरितां मूर्खा! त्याच्याकडे पाहुणा आलों तो मी माझ्या पदरचं खाऊं? रागोपंताच्या गृहस्थपणाला कमीपणा नाहीं का तो?

**रागोपंत**—खरं आहे. खरं आहे. जा तूं आपला घेऊन! वक्रतुंड, तूं जा बरोबर आणि त्यांची व्यवस्था लावून दे.

**वक्रतुंड**—यजमानमित्र, उपवनद्वारीं शकट स्थित आहे; सारथी भाड्याची विचक्षणा करतो.

**वारोपंत**—अजून लेकाचा उभाच! पहा, पहारे रागोपंत, काय म्हणतो तें?

**रागोपंत**—पाहतों. जा, तूं. [ रागोपंत जातो.

**वक्रतुंड**—इतो, इतो यजमानमित्र; असं असं पलायन करावं!

[ वारोपंतासह जातो.

**कवीश्वर**—काय करावं बाबांच्या या विकट स्वभावाला! पैसा म्हणजे त्यांचं जसं परब्रह्म! बाकी इथं कुणी कुणाला हंसायचं म्हणा! पहावं तों एकेकाची तऱ्हा निराळीच! काय हे विचित्र स्वभाव! पण हेच निसर्गाचे वेडे-वांकडे बोल लेखकांच्या लेखणीला स्फूर्ति देऊन, कवींच्या काव्यरसाला ऊत आणतात आणि संसाराचं चटकदार नाटक निर्माण करितात! हो, पण माझ्या दृष्टीनं या नाटकांतील महत्त्वाचं पात्र ती गौरी, अजून कुठें दिसलीच नाहीं. तिच्याशिवाय साऱ्यांची तोंडओळख झाली. जिकडे तिकडे 'बोलाची कढी आणि बोलाचाची भात'—आणि मला खरीच कडकून भूक लागली आहे तरी या कढीभातावरच आज बहुधा दिवस काढावा लागणार असं दिसतं!

[ **गौरी** येते तिला पाहून तोंड फिरवून स्वस्थ बसतो.]

**गौरी**—( त्याला न पाहतां आपल्याशींच ) बरं झालं! मी मैत्रिणीकडून चांगलं चमचमीत जेवण उरकून आलें; अजूनसुद्धां घरांत तयारी दिसत नाहीं. ज्या दिवशीं भांडणाचा त्रास, त्या दिवशीं घरांत निर्जळीचा उपास-म्हणून तो दिवस मैत्रिणींकडे द्वादशीचा ठरवून ती सोडायला मला नेहमीं असं आगांतुक जावं लागतं. ( कवीश्वराला पाहून ) अगबाई! हा आणखी कोण आमच्या बागेंत दुसरा आगंतुक? आज बागेवर हा दुसरा हल्ला! सकाळीं त्या म्हाताऱ्या-चा झाला आणि आतां हे कुणी तरुण येऊन बसले आहेत! छुपट वानरांची एखादी टोळी तर नाहीं सुटली गांवावर! आमचा हा सार्वजनिक बाग आहे असं का हे समजतात! काय हो! येतांना चिवडा नाहीं का आणलात बरोबर?—ऐकूं नाहीं का आलं? म्हटलं चिवडा नाहीं का आणलात बरोबर?

**कवीश्वर**—नाहीं आणला हीच चूक झाली. रागोपंतासारख्या प्रतिष्ठित गृहस्थाकडे, जेवणाचाही पाहुणचार होणार नाहीं अशी आमची कल्पना नव्हती!

**गौरी**—म्हणजे! कोण तुम्ही? आमचे पाहुणे! बोला, असं नुसतं पाहतां काय?

**कवीश्वर**—तुमच्या घरच्या बायकांचं तोंडकसबाचं प्रदर्शन! रागो-काकांची गौरी म्हणून एक अविवाहित मुलगी आहे—

**गौरी**—हो, हीच आहे ती. तिला पहायला आलेले तुम्ही पाहुणे आहांत वाटतं? बाई! बाई! आतां स्वतःला दाखवावयाचं तरी कितीकांना!

**कवीश्वर**—म्हणजे! आजवर बरेचजण पाहून गेलेले दिसतात!

**गौरी**—अहो, किती तरी! कुणि वरानं यावं, वधु पाहूनि जावं—

**कवीश्वर**—म्हणूनच आलों आहें मी वर कवीश्वर, वधूचं संशोधन करण्यासाठीं.

**गौरी**—अगबाई! वारुकाकांचे कवि असलेले चिरंजीव ते आपणच वाटतं? वारुकाका बाबांचे स्नेही आणि तुमचा जेवणाचाही पाहुणचार झाला नाहीं म्हणतां? ( स्वगत ) सकाळच्या भांडणामुळं नसेल झाला खराच!

**कवीश्वर**—नुसतं साखरपाणीसुद्धां नाहीं. तूं आलीस आणि त्यामुळं माझ्या तोंडाला तर सारखं पाणी सुटलं आहे. चिवड्याची गोष्ट कशाला काढलीस?

**गौरी**—थांबा अं!

**कवीश्वर**—प्रहरभर थांबलों, पोटांत भूक वखवखली आहे, तरी अजून सुद्धां नुसतं थांबाच का? बाकी इथं नुसतीं तोंडपक्वान्नंच मुबलक दिसतात!

**गौरी**—काय करावं या गर्गशेला! कुणी आला तर विचारपूस करायचं मेलेला सुचेल तर ना! या स्वयंपाकिणी साऱ्या अशाच बेपरवा! गर्गशे, अग गर्गशे!

**गर्गशा**—( प्रवेश करून ) काय ताईसाहेब?

**गौरी**—अग सटवे! इथंच जवळ होतीस वाटतं? काय ग पहात होतीस?

**गर्गशा**—हे कुणी नवीनच तरुण मघांपासून बागेंत बसलेले दिसले, म्हटलं कोण आहेत?

**गौरी**—तुला ग कशाला या चवकशा? जा चट्कन्, थोडं उप्पेटू आणि दोन कप चहा ठेव पाहूं.

**कवीश्वर**—( स्वगत ) आईसारखी बेटी कांहीं अगदींच बेपर्वा दिसत नाहीं !

**गर्गशा**—( कवीश्वराकडे पहात पहात ) बरं, ठेवतें हो. [ जाते.

**कवीश्वर**—म्हणजे नुसत्या चहावरच पाहुण्याची बोळवण करणार म्हणायची ! बाकी पाहुण्याला घरांत न घेतां महारासारखं बाहेरच्या बंगलींत रहायला हांकून देण्यापेक्षां हें पुष्कळ बरं !

**गौरी**—अं ! असं कसं होईल ? हं ! का तुम्ही आल्याबरोबर पाहुणे-यजमानांचं मोठं खडाष्टक वाजलं ?

**कवीश्वर**—तुझ्या आईला विचार.

**गौरी**—( स्वगत ) काय बाई तरी ! (प्रगट) हो, हो. मला ठाऊक आहे ! दोन हाताशिवाय टाळी वाजत नसते म्हटलं ! वधू पहायला आलेली तुम्ही वरपक्षाची मंडळी; नेहमींप्रमाणे वरचढच असायची. त्या तोऱ्यांत तुम्हींच काढलं असेल कांहीतरी भांडण उकरून झालं !

**कवीश्वर**—घरचा बराच अभिमान दिसतो तुला ! गृहछिद्रें आम्हांला जितकीं कमी दिसतील—

**गौरी**—नव्हे, नव्हे ! एकमेकांचीं एकमेकांना—

**कवीश्वर**—तितकं बरंच ! ह्या दृष्टीनं आम्ही घरांत राहिलो नाहीं हें एकपरीनं चांगलंच झालं नाहीं का ? तरी पण आम्ही वधूपरीक्षा अगदीं कसून केल्याशिवाय राहूं असं नको समजूं अं !

**गौरी**—तरी वाटलंच, हे कवि असे हुडक्या नजरेनं माझ्याकडे कां पाहतात ? पण ठाऊक आहे का तुम्हांला ? मला आतां कुणाच्या परीक्षेचं भयच राहिलं नाहीं मुळीं.

**कवीश्वर**—बरोबर आहे. भांडखोरपणामुळं तुझ्या आईबापांना तुझ्या साठीं स्थळं पहायला वेळ होत नसेल तेव्हां येणार कोण परीक्षेला ? असंचना ?

**गौरी**—आणि येतात ते तुमच्यासारखे चंगीभंगी कवि ! नट्टनथट्टन मनायोग्य पुरुषाची मीं वाट पहात बसावं आणि गांठ पडावी ती तुमच्यासारख्या तऱ्हेवाइकापाशीं ! म्हणून माझं मीच आतां स्वयंवर मांडणार आहें.

**कवीश्वर**—चांगलं ! हो. आपल्या तोंडाभोंवतीं दिवा ओंवाळायला कुणी तयार नसलं तर आपणच आपलं तोंड दिव्याभोंवतीं ओंवाळून घेतलं पाहिजे !

**गौरी**—खरं ना ? मग आतां सांगतें तें नीट लक्षांत ठेवा. कवि म्हणून आधींच चंगीभंगी आणि नव्हेवाईक तुम्ही तशांत भांडखोर आईबापांचे चिरंजीव, कसे असाल तें सांगायला का हवं ? अशाशीं लग्न लावून जन्मभर भांडत बसायचं ? नको ग बाई ! तेव्हां तुमच्याभोवतीं कांहीं माझं तोंड ओंवाळून घ्यायला मी तयार व्हायचीं नाहीं, समजलांत !

**कवीश्वर**—आणि झालीस तरी मीच तुझ्यासारखी बायको पत्करायला तयार नाहीं; तूं पण लक्षांत ठेव भांडायला नको म्हणून तोंडानं म्हणतेस आणि त्याच तोंडानं माझ्याशीं वाद घालतेस ! तुम्हां बायकांच्या तोंडाळपणावर मुक्यांचा मारा एवढंच अगदीं एक रामबाण औषध आहे.—इतकं कीं कधीं कधीं अनेक बायकांना गप्प करायला एक मुकासुद्धां पुरेसा होतो !

**गौरी**—म्हणजे मला मुका नवरा पाहून दिला पाहिजे म्हणतां ?

**कवीश्वर**—अलबत ! तुम्हां बायकांना एरवीं दागिन्यांचा कोण हव्यास ! पण मौन हा सृष्टींतला मोठा मोलाचा अलंकार असूनही तो तेवढा तुम्हांला वापरायला आवडत नाहीं. तुला दाखवूं का एखादा मुक्याचा प्रयोग ?

**गौरी**—अगबाई ! ( धावरून लांब होते आणि कवीश्वर गुलाबाचें फूल तोडूं लागतो.) हें हो काय हें ? कुणींसुद्धां बागेंतलं फूल तोडायचं नाहीं; तशांत तो गुलाब माझा आहे. त्याला हात लावायचाच काय, पण त्याच्याकडे ढुंकूनही पहायचं नाहीं !

**कवीश्वर**—हा तुझा गुलाब अं ? घेऊं दे कीं मला एक फूल ! माझा हातगुण असा आहे कीं, याच्या स्पर्शानं थोड्याच वेळांत तो चांगला प्रफुल्लित होईल !

**गौरी**—मोठे हातगुणाचे ! आज माझ्या गुलाबावर, उद्यां प्रत्यक्ष माझ्यावरच जबरदस्ती करायला लागायचे ! आजपर्यंत मला पहायला आलेले तोंडाचेच बोलके होते, पण तुम्ही तर–मला जरा जपूनच वागलं पाहिजे. आणि तुमच्यापासून चार पावलं दूरच राहयलं पाहिजे.

**कवीश्वर**—ठीक आहे, रहा दूर ! ( गुलाबाचें फूल तोडून घेऊन ) पण येवढी माझी ही आठवण ठेव म्हणजे झालं !

**गौरी**—हें काय हो ! हे काय खेळ मांडले आहेत तुम्हीं !

**कवीश्वर**—मुक्याचा खेळ तो हाच ! तुला दाखवायचा राहिला होता. बायको

ह्या विचारी प्राणि आहे अशा समजुतीनं तिच्या बडबडीकडे लक्ष देऊन तिच्याशीं वितंडवाद घालीत न बसतां अयोग्य नसेल तर चटकन कृति करायची आणि इच्छेविरुद्ध असाच गुलाब खुडायचा !

**गौरी**—माझी ही सारी बडबड आणि वितंडवाद का ?

**कवीश्वर**—जवळ जवळ तसंच. तुला पहायला येणारांशीं नेहमीं तूं अशीच हुजत घालीत बसतेस, हेंही आजवर तुझं लग्न न जुळायला एक कारण आहे. खरंना ! पहिल्याच भेटींत मला तूं चंगीभंगी, तऱ्हेवाईक आणि भांडखोर ठरवलंस तें काय म्हणून ? रागावूं नकोस. हें तुझं फूल मीं तोडलं तेव्हां तें माझं झालं, खरं ना ? आतां घे पाहिजे तर तुझं तुला परत आणि घाल तें त्या आपल्या काळ्या-भोर सुंदर केसांच्या अंबाड्यांत ! रागानं गालगुलाब खुलले आहेत, त्यांच्याशीं स्पर्धा करीत तें ह्या झाडापेक्षां त्याच ठिकाणीं अधिक शोभेल ! (तिच्या अंगावर टाकतो.) अशा तऱ्हेचा मी मुका झाल्यावर मग तर माझ्याशीं लग्न करायला हरकत नाहींना ! शिवाय तुला तुझ्या वडिलांनीं मलाच द्यायचं योजिलं आहे.

**गौरी**—माझं अडलं आहे खेटर तुमच्यासारख्याशीं लग्न लावायला ! आपल्या मनासारखं तर करायचं—

**कवीश्वर**—पण योग्य असेल तेंच ! भलतंसलतं नाहीं.

**गौरी**—वरं हो, पण बायकोच्या मनाविरुद्ध असलं तरी करायचंच आणि मग तिची समजूत घालायची, असेचना वागणार तुम्ही ! ठाऊक आहे मला. भांडखोरांनीं योजलेला भांडखोर आईबापांचा मुलगा भांडखोरच असायचा ! आईबापांनीं निवडलेल्याशीं मी कधीं कधीं म्हणून लग्न करायची नाहीं.

**कवीश्वर**—हो, स्वयंवर मांडलं आहेस तूं ! विसरलोंच मी. पण नवरा तरी कसा पाहिजे तुला ? ऐकूं दे एकदां ?

**गौरी**—ते तुम्हांला सांगत बसायची मला जरूर ?

**कवीश्वर**—फारशी नाहीं. आपलीं दोघांचींही वडील माणसं आपलं लग्न ठरविणार आहेत. तें कदाचित् जमलंच तर आपली तुझी माझी नवराबायकोची कल्पना एकमेकांस माहिती असावी !—लग्न जमलंच तर फायदा होईल; नच जमलं तर नुकसान कांहींच नाहीं. मला बायको कशी पाहिजे तें हवं तर मी

अगदीं स्पष्ट सांगतों तुला. कारण मला कांहीं माझा संसार तुझ्या आईबापांच्या अगर माझ्याही आईबापांच्या वळणावर न्यायचा नाहीं !

**गौरी**—बरं, बरं ! ऐकूं द्या तर खरं, कशी बायको हवी आपल्याला तें ?

**कवीश्वर**—सांगूं ? सर्व सुंदर पण गर्व नाहीं; गोड भाषणी पण तोंड-वासणी नाहीं; कनककाया पण भपका नाहीं वाया, सदा म्हणे या, या—जशी तप्ताला शीतल छाया; विचारी हृदय पण झांकल्या मनाची; प्रेमाची सदा गरजू पण मानधनाची !

**गौरी**—म्हणजे अगदीं आंखुडशिंगी, बहुदुधी पाहिजे म्हणायची ! अस्सं ! बरं कां हो, तुम्ही मला पहायला आलांत; पाहिलंतही; तर मी तुम्हांला कशी काय वाटते तें सांगा बरं ?

**कवीश्वर**—फार चांगला प्रश्न विचारलास गौरी ! आपले दोष काय आहेत ते समजावून घेऊन शक्य तितके ते काढून टाकायचा प्रयत्न प्रत्येकानं केलाच पाहिजे. बायकोनं केला पाहिजे, नवऱ्यानंही केला पाहिजे. एरवीं संसार सुखाचा कसा होईल बरं ?

**गौरी**—पुरे-पुरे, हा आजोबी उपदेश नको मला. मी कशी आहें तें सांगा म्हणजे बस्स !

**कवीश्वर**—हृदय कोमल पण औदार्य नाहीं, नुसती रड फार; अति प्रबल पण शस्त्र नाहीं, जिव्हेनं मारशील ठार; बुद्धि चपल पण विवेक नाहीं. नकारान करशिल गार; सुंदर पण सुघेपणा नाहीं; हें थोडक्यांत तुझं सार -ऐकलंस ? तेव्हां हे क्षुल्लक दोष सोडून मीं वर वर्णन केलं तशी तूं होशील तरच मी तुझ्याशीं लग्न लावायला तयार होईन. व्यक्तिस्वातंत्र्याच्या भलत्याच कल्पना आणि स्त्री-स्वातंत्र्याचे तुझ्या आईसारखे भलतेच चोचले तुझे मी केव्हांच चालूं देणार नाहीं, लक्षांत ठेव !

**गौरी**—फार चांगलं. आतां आपल्याशीं माझं लग्न लागेल ही मला काळजीच उरली नाहीं. वडिलांनीं ठरविलंच तरी तुम्हीच मला पत्करणार नाहीं. कारण इतकीं बंधनं आणि असल्या अटी आपल्या आईबापांच्यानंही पाळल्या जाणार नाहींत. मला नवरा पाहिजे तो-( **कर्कशराव** येतो. त्याला एकाएकीं पाहून ) तो पहा सकाळचा वृद्धकपि अजून इथंच आहे कीं !

**कवीश्वर**—त्याच्यासारखा ?



**गौरी**—फार चांगलं! आतां आपल्याशीं माझं लग्न लागेल ही मला काळजीच उरली नाहीं ! [पृष्ठ ३६.

**गौरी**—इश्श ! एकाएकीं आला म्हणून आपला दाखविला तुम्हांला ! नाटक लिहिणार असाल तर खास पात्र आहे त्यांत घालायला ! पहा, पहा कसा मेला आपल्या माकडतोंडांतल्या खोल डोळ्यांनीं माझ्याकडे कसा रोखून पहात आहे !

**कर्कशराव**—घटका गेलीं, पळें गेलीं, तास वाजे ठणाणा । आयुष्याचा नाश होतो, राम कां रे म्हणाना । ( जवळ येऊन निरखून पाहून ) कोण रे तीं ?

**कवीश्वर**—मी बारोपंतांचा मुलगा कवीश्वर. नमस्कार करतों आजोबा.

**कर्कशराव**—शतायुषी भव ! लवकरच तुझे दोहोंचे चार हात होवोत; पण काय रे गाढवा,...गौरीच ही, हिच्याजवळ इथें एकांत रे कसला करीत होतास ? आणि काय गो, तो पुरुष तरी आहे, तूं कुलीन मुलगी-तरणीताठी पोर—

**गौरी**— हो-मग ?

**कर्कशराव**—वा रे, सोनटक्की ! बेशरम कुठली !

**गौरी**—तुम्ही हो कोण मला असं बोलणारे ? वा रे वा !

**कर्कशराव**—सांगू का तुला मी कोण तो ? ( काठी उगारतो. )

**कवीश्वर**—( त्याला निवारून एकीकडे ) क्षमा करा आजोबा, नातीच्या मुखांतून काय मुक्ताफळं पडतात तीं तर पाहूं ! तुम्ही येण्यापूर्वी आपल्याला नवरा कसा पाहिजे, हें सांगणार होती मला. हं ! सांग पाहूं. तुला नवरा माझ्यासारखा नको तर मग कसा पाहिजे सांग पाहूं ?

**गौरी**—पण तुम्हांला कशाला पाहिजेत या पंचायती ?

**कवीश्वर**—कशाला म्हणजे ! तूं वर्णन केलंस, म्हणजे माझ्यांत काय कमी आहे तें मला समजून, तूं मला हवी असलीस तर मला तसं होतां येईल !

**गौरी**—पहिली मुख्य गोष्ट, म्हणजे मला गाडीमोटारींतून मिरवायला सांपडेल इतका तो श्रीमंत असला पाहिजे.

**कर्कशराव**—बरें, बरें.

**गौरी**—माझ्या अंगावर पुष्कळ-पुष्कळ दागिने घालणारा पाहिजे.

**कर्कशराव**—बरें, बरें.

**गौरी**—बाबा आईला पुरेसे पैसे देत नसल्यामुळें ते तिला बाबांच्या

खिशांतून किंवा तिजोरींतूनही अपरोक्ष काढून घ्यावे लागतात, तसं नको. मी जितके मागेन तितके तो मला देणारा पाहिजे.

**कर्कशराव**—हं !.

**गौरी**—बाबा जशीं आईचीं, तशीं तो माझीं बोलणीं ऐकून घेणार !—

**कर्कशराव**—म्हणजे बायल्या पाहिजे !—

**गौरी**—चांगला रंगेल, सुंदर, गुलहौशी असा सोकाजी.

**कर्कशराव**—म्हणजे एखादा महा गद्धाच पाहिजे म्हणेनास ! (स्वगत) वेशरम कारटी ! (उघड) फुटाणी पोर, तिला मिठाणा नवरा; मग हा काय वाईट आहे ?

**गौरी**—हे मोठे गोड मार्मिक बोलणारे खरे, तरी फार वस्ताद कुचाळखोर आहेत !

**कर्कशराव**—चूप ! घरांत रागयाचा दाब नाहीं तर कशी पाचकळ झाली आहे कारटी ! इथें एकांतांत दोघांचा सारखाच गाढवपणा चालू होता. तिथून पहात होतों मी तुमचे थेर. तेव्हां आतां तुमचेच दोघांचें लग्न झालें पाहिजे आणि ए–ए, बेशरम फुटाणे. असाच पाहिजे तुला घो ! नाहीं तर आयशी-सारखी नवऱ्याला नाचवशील–याच्याशींच लग्न लाविलें पाहिजे तुला.

**गौरी**—नाहीं ! कधीं नाहीं ! आणि तुम्ही कोण हो माझ्यावर ही जबरी करणार ?

**कर्कशराव**—मी तुझ्या बापाचा बाप—

**गौरी**—म्हणजे ?

**कर्कशराव**—आजल्यापुढें लांब जीभ काढतेस ! ( काठी उगारतो.)

**गौरी**—( लांब होऊन ) माझे आजोबा ! तुम्ही कसे माझे आजोबा ? मी नाहीं समजत तुम्हांला आजोबा बाबांनीं सांगितल्याशिवाय !

**कर्कशराव**—जा, जा; विचार तुझ्या बापसाला ! अचरट कुठली ! चल, निघ इथून.

**गौरी**—( कर्कशरावाकडे पहात–स्वगत ) आजोबा ! अगबाई ! खरंच, आजोबा का हे ? ( खजील होऊन जातां जातां कवीश्वरास एकीकडे ) आपण इथंच थांबा अं जरा. चहा, फराळाचं झालं कीं नाहीं पाहून येतें.

**कर्कशराव**—रांडेच्यांनो ! खुणा रे कसल्या करतां ? छेः छेः छेः ! घोड

वाढली, झटपट हिला उजवलीच पाहिजे! नाहीं तर कारटी अधिक बिघडणार! हिला सात गाढव नवरा पाहिजे. का? ए, ए-महामूर्खा, तुला ती कबजांत आणतां येत नसली तर हो तूंच आतां सात गाढव! तुमचेंच दोघांचें लग्न लागलें पाहिजे; समजलास का? किती उद्धट पोरटी! नमस्कारसुद्धां केला नाहीं मला! बघूं कुठें गेली ती! [ जातो.

**कवीश्वर**—मीच होऊं आतां सात गाढव? वाः! हें ठीक झालं! गौरीला पाहिजे तसा मींच व्हावं, कीं काय करावं, म्हणून डोकं खाजवीतच होतों, त्याला ही या आजोबांची सूचना बरी मिळाली. आमचंच दोघांचं लग्न लागलं पाहिजे. वाः! आजोबांचाच असा पाठिंबा असल्यावर मग काय? गौरी नुसती तोंडाची फटकळ, समजा-भांडखोर आईबापांची मुलगी; पण नातीमध्यें आजोबाच्या हृदयाचा सरळपणाही आहे! तिची ती एकच हरणासारखी भाबडी नजर तिच्या सरळ हृदयाची चटकन् ओळख करून देते. आईबापांच्या दुर्लक्षांमुळें यांत भलत्याच कल्पना शिरल्या आहेत इतकंच. त्या काढून टाकणं फारसं कठीण नाहीं. ठरलं! असंच करायचं!-गौरीच्या मनांतल्या भलत्याच कल्पना काढून टाकायला दुसरा चांगला उपायच नाहीं. आजोबा जुन्या पिढीचे-पण जुन्यांचे तोडगे केव्हां केव्हां नव्यांनाही मागें सारणारे असतात. खरंच, घरासारख्या लहानशा रंगभूमीवरसुद्धां केव्हां केव्हां किती मौजेचीं नाटकं होत असतात! बस्स! खडाष्टक हेंच माझं नाटक, आणि त्यांतला गौरीला जसा पाहिजे तसा सोकाजी-पण-पण बोलून दाखविण्यांत काय अर्थ? नाटक करून दाखवायचं असतं.

[ **गौरी** प्रवेश करते.]

**गौरी**—आजोबा गेले का? सूचना द्यायला आले. चहा, उप्पिट्ट तयार आहे. चलायचंना?

**कवीश्वर**—येतों; पण पहिली तहानभूक तुझ्या हातच्या पदार्थावर भागली असती तर बरं झालं असतं!

**गौरी**—हं! तोंडाला पाणी सुटत चाललं! पण हें पहा, आजोबांनीं काहीं म्हटलं तरी—

**कवीश्वर**—नाहीं. म्हटलं सुग्रण आहे कीं नाहीं तीही वधूपरीक्षा झाली असती!

**गौरी**—बाई! बाई! बाई! बायकांच्या संबंधांत तुम्ही पुरुष भारीच लोंचट बाई!

**कवीश्वर**—तुला तरी दुसरं काय पाहिजे? तुझी वाटेल ती हौस, वाटेल तो शब्द वरचेवर झेलून धरणारा नवराच तुला पाहिजे, म्हणजे लोंचटच पाहिजे! तसंच बनण्याचा प्रयत्न करणार आहें मी. चल, चहा गर्गशेनं केला, पण पेला तरी या परीच्या हातचा मिळूं दे—

[ जातात. पडदा पडतो.

## अंक पहिला समाप्त

# अंक दुसरा

## प्रवेश पहिला

[ **स्थळ**—बाग. फुलांची परडी घेऊन **गर्गशा** आणि समोरून चौपदी घेऊन **वक्रतुंड** प्रवेश करतात.]

**वक्रतुंड**—( स्वगत ) आहाहा ! या रममाण पुष्पारण्यांत पुष्पसंचयाचा प्रातर्विधि करतांना भ्रममाण होणारी ही चपलचरणा कशी शोभायमान होत आहे ! या लावण्यसमर्यी हिची वर्णनपरंपरा किती करूं ? ( जवळ जाऊन मोठ्यानें ) वा, वा ! गर्गशे, हे प्रचंड सुंदरी—

**गर्गशा**—अहो प्रचंड पशुपति ! आपला काव्यरस पुरे करा. बाजारांत भाजी आणायला चाललांत ना ? जा लवकर. आजोबा आल्यापासून आता पहिले दिवस राहिले नाहींत, लक्षांत आहेना ? नुसता भाजीला थोडा उशीर झाला तर तो म्हातारा पाठीचं धिरडं उडवील कीं !

**वक्रतुंड**—होय ग. ( पावली पुढें धरून ) पुरातनकालीं यजमानाकडून बाजारकर्मांकरितां रोज संपूर्ण रुपयाचं उड्डाण होत होतं; आजही झालं ! इतक्यांत पितामहाचा संचार झाला ! त्यांनीं तो संपूर्ण रुपया प्रतिग्रहण करून माझ्या हातावर हें चतुर्थांश रुपयाचं गोप्रदान दिलं !

**गर्गशा**—होय वक्रतुंड, या थेरड्याची साऱ्या घरभर अशी बारीक नजर असते म्हणतां ! देवासमोर गीतापाठाला बसतो तोसुद्धां पाठ देवाकडे आणि तोंडाची गीता चुलीकडे ! चहा घेत नाहीं, तरी चहाच्या वेळीं आपला थेरडा चुलीजवळ हजर ! एखादी वस्तु अधिक उणी करीन म्हटलं तर हें वक्रध्यान कुठून तरी पहातं आहे अशी धास्ती वाटते, मग कांहीं लांबवायची गोष्ट तर दूरच !

**वक्रतुंड**—विधिघटना प्रक्षुब्ध झाली; प्राचीन कालाप्रमाणं यापुढं द्रव्याचं आकलन होणं कठीण, म्हणूनच तुझ्या सन्निध विलाप करून आपली लग्नघटि

लंबायमान करूं नको म्हणून तुझं पुन्हा या रममाण प्रातःकालीं अवधान ओढतों–त्यासाठींच इथं उत्तीर्ण झालों आहें !

**गर्गशा**—आणि म्हणूनच ही चौपदी बरोबर आणलीत वाटतं ?

**वक्रतुंड**—भाजीकरतां कसलं उद्भिज्ज आणायचं त्यांचंही या माझ्या गृहिणीजवळ प्रवचन करूं म्हटलं !

**गर्गशा**—मग तें मालकिणीला विचारा. मी काय सांगूं ?

**वक्रतुंड**—पण मालकीण अजून पलंगासक्तच आहे. निद्राभोग संपूर्ण झाला नाहीं !

**गर्गशा**—मग जा आणि आणा कांहींतरी भाजी.

**वक्रतुंड**—हो, पण माझ्या लग्नरचनेचा घोर विचार तुझ्या हृदयकुंडांत प्रज्वलित केला आहे त्याचं काय ?

**गर्गशा**—त्याचा प्रकाश फारसा नव्हताच पडला ! त्यांत ते कवीश्वर आल्यापासून तो अगदींच विझला आहे !

**वक्रतुंड**—कवीश्वराशीं लग्नरचना ! तुझ्या इच्छेचं केवढं घोर उड्डाण हें ! कुठं कवीश्वर ! कुठं गर्गशा ! तो गौरीचा गोग्रास असून त्याच्याशीं यजमान हीं आपल्या कन्येला नष्टकौमार्य करणार आहेत ! हें व्याख्यान श्रवण कर आणि स्तब्ध हो. असा परस्त्रीव्यभिचार करूं नको !

**गर्गशा**—म्हणजे, तुम्हांला अजून एक गंमत ठाऊकच नाहीं म्हणायची ! ताईसाहेबांनीं कवीश्वराला साफ नाहीं म्हणून सांगितलं. शिवाय त्यांच्याकरितां त्यांना आवडेल असा कोणी फक्कड, या बागेभोंवतीं सारख्या घिरट्या घालतोच आहे. ताईसाहेबांचं आतांशा शिकण्याकडे लक्ष आहे कुठं ? शाळेंत म्हणून जातात आणि भटकत असतात कुठल्या तरी बागेंत झालं !

**वक्रतुंड**—महाभयानक वार्ता ! पितामहांच्या–त्या प्राचीन पुराण-पुरुषाच्या–कर्णरंध्रांत प्रविष्ट केली पाहिजे. ते असले नवीन ढंग चालू देणार नाहींत. गर्गशे, तें कांहीं जरी असलं तरी कवीश्वराशीं तुझं मिश्रण कसं होणार ? तुझ्या स्थानीं मी बरीक अत्यंत विरक्त आहें. कवीश्वर झाला तरी तो लहान पोर, मी पुराणपुरुष ! तो शिक्षामंडित असला तरी मी महापंडित आहे ! गीर्वाण भाषेंत मी स्थिर असून शब्दशास्त्रांत उच्छृंखल आहें ! संस्कृतांत

माझं अगम्य गमन असून काव्यरसांत तर अपेय पान आहे; तेव्हां गूढ विचारणा कर.

**गर्गशा**—केली बरं, केली! कवीश्वर रसिक कवि असून उगीचच का माझ्याकडे नेहमीं मोठया कौतुकानं पहात असतात?

**वक्रतुंड**—तरी पण देहाचं गोप्रदान करायचं तें तूं पात्र पाहूनच केलं पाहिजेस. कवीश्वर माझ्यासारखा प्रसिद्ध पुरुष नाहीं. वाग्भटाचं सुश्रुत चरक काव्य मीं मस्तकोद्गत केलं आहे! खरोखर गर्गशे, दिने दिने देवरचनेसमयीं देवाऐवजीं तुझं सेवन करावं, चंदन उगाळून तुझी चर्चा करावी, अभिषेकानं तुला शैत्य आणावं, तुझं ध्यान पाहून चिंता करावी आणि तुझ्या ठिकाणीं धारणा काय करावी आणि काय नाहीं असं माझं देहावसान होतं!

**गर्गशा**—फार चांगलं होतं. आतां भाजीला उशीर झाला तर आजोबांकडून बरीक खरोखरच तुमचं देहावसान होईल!

**वक्रतुंड**—हो, आतां निर्गमन केलंच पाहिजे. पण शेवटची विचक्षणा करून ठेवतों. पंचसंवत्सर शागीर्दपणाचा विलास करून गोरक्षणफंड म्हणून दीडशें रुपये स्थायी करून ठेविले आहेत. ते आपलं लग्नघटियंत्र चांगलं तिष्ठवतील. द्रव्याचं जास्त संग्रहण अशक्य. भविष्य चांगलं नाहीं, म्हणून लग्नकुंडांत आतांच दोघांची आहुति टाकिलेली बरी!

**गर्गशा**—एकदां सांगितलंना, नाहीं म्हणून? व्हा चालते इथून. आजच मी हल्लींच्या प्रीतिविवाहाच्या पद्धतीप्रमाणें कवीश्वरांना स्वतःच सांगून जाणार आहें

**वक्रतुंड**—जा, तुझा इतका दर्प नको. बाजारनिर्गमनानंतर मीही कवीश्वराकडे जाऊन त्याच्या हृदयपेटिकेंत गौरीची धारणा करतों आणि ती झाल्यावर मग पाहतों तुझं कसं अधःपतन होत नाहीं ते! [ जातो.

**गर्गशा**—गेली एकदांची धिंडका! मी इकडे आलें फुलं वेंचायला! पण माझं हें नुसतं निमित्त. सोकाजीराव आणि ताईसाहेब यांच्या हितगुजांतली मध्यस्तीण मी. ते आल्याबरोबर ताईसाहेबांना कळवण्यासाठीं म्हणून बागेंत आलें तर आला मेला इथंसुद्धां मागं हुडकीत. सोकाजीराव अजून कां बरं येत नाहींत? कवीश्वर इथं आल्याबरोबरच सोकाजीरावांकडे ताईसाहेबांचं लक्ष लागावं हा कवीश्वराविषयीं माझे हेतु तडीस जाण्याला खरोखर एक शुभशकुनच नव्हे का? सोकाजीरावाविषयीं ताईसाहेबांना अशीच मी सारखी भर देत राहणार! अगबाई! काय

बरं वाजलं तिकडे ! ( दगडाला बांधलेली नोटेची पुडी पुळ्यांत पडते; ती उचलून आणि सोडून ) अहाहा ! पांच रुपयांची नोट ! सोकाजीराव किती चतुर तरी ! ह्या एकाच गोष्टीनं आल्याची खूण आणि कामाचं बक्षीस ! ( **सोकाजीराव** लतांच्या झुडपामागें दिसतो व तिला खूण करतो. तीही खूण करून नोट लपवीत तांतडीनें जाते.)

**कवीश्वर**—( सोकाजीच्या पोषाखांत प्रवेश करून ) मी कवीश्वर सोकाजी बनून सोकाजी आणि कवीश्वर या दोघांमध्यें चांगुलपणाच्या दृष्टीनं असलेला फरक गौरीच्या मनाला पटविण्याचा उद्योग चालविला आहे खरा, तो तिला पटत असल्याचें तीही केव्हां केव्हां बोलण्यांत दर्शविते–तरी पण सोकाजीविषयीं तिचं वेड कांहीं अद्यापि कमी झालेलं दिसत नाहीं. मी करीत असलेला हा वेषपालट नाटक-कादंबऱ्यांतूनच शोभण्यासारखा आहे. लोकांना तो बरा वाटणार नाहीं आणि रोजच्या व्यवहारांत माझा मलाही तो बरा वाटत नाहीं. आतां एवढं बरं आहे, कीं इथं सगळ्यांच्या वागण्याकडे अगदीं करड्या नजरेनं पाहणारे आजोबा याकडेच मुद्दाम कानाडोळा करीत आहेत, असं दिसतं तेव्हां परवांच्या त्यांच्या सूचनेचा रोख असाच कांहीं तरी असावा. पण मी तरी काय करूं ? गौरीसारखी, व्हावलेली खरीच; पण चटकदार सुंदर आणि सरळ मनाची मुलगी मलाच मिळावी असं आतां माझं मलाच मनःपूर्वक वाटूं लागलं आहे. संसारसुखाच्या अचरट कल्पना उराशीं बाळगल्या म्हणजे एखादा गुंड घाला घालण्याचा कसा संभव असतो हें गौरीला समजलंच पाहिजे, आणि बेशिस्त संसारांत मुलांकडे दुर्लक्ष झाल्यामुळं तीं कशीं वाहवत जातात हेंही, आमच्या आईबापांच्या लक्षांत आलं पाहिजे. अरे वा ! ही गौरी आलीच. [ **गौरी** येते.

**गौरी**—( स्वगत ) सोकाजींचा निरोप आला कीं, एकीकडे आजोबा आणि दुसरीकडे ते कवीश्वर या दोघांचाही डोळा चुकवून चोरटेपणानं मला इकडे यावं लागतं. पण हा नुसता डोळा चुकवण्यापुरताच चोरटेपणा असता–नाहीं–काय असेल तें असो, या दोघांमुळंच–हो आणि या दोघांमुळंच केवळ–मनालाही हा चोरटेपणा वाटतो. आजोबांचं एक असो–ते आजोबाच आहेत–पण कवीश्वरामुळं हा माझ्या मनाला चोरटेपणा कां वाटावा !–हो, कां वाटावा ! नाहीं, मी सोकाजींची भेट घेणारच !

**सोकाजी**—( पुढें होऊन) ये, ये, लाडके. दुःखानं कावलेला मनुष्य,

मनाच्या बेभान अवस्थेची जितक्या आतुरतेनं वाट पहातो तशीच विरहानं गांजलेला मी तुझ्या संमेलनाची मार्गप्रतीक्षा करीत राहतों बघ. तू आलीस म्हणजे माझ्या मनाचा मनपणा नाहींसा होतो, विचारशक्ति कुंठित होते, जाणीव नष्ट होते आणि अशा रीतीनं लाडके, मी तुझ्यांत, तुझ्या स्वरूपांत रंगून जातों— अगदीं गुंग होऊन जातों !

**गौरी**—खरंच ! ही प्रातःकाळची रम्य वेळ, साऱ्याच गोष्टींना सजीवता देणाऱ्या सूर्यनारायणाची ही चढती कमान शरिराला हुषारी देते, तशीच मनो-भावनांचाही चढाव केल्याशिवाय रहात नाहीं. इच्छा, आशा, प्रेम या साऱ्या गोष्टींना अशा वेळीं चढावाची चालना मिळून या चारी दिशांना पसरलेल्या गुलाबी रंगा-प्रमाणं सर्वत्र प्रेम दरवळून गेल्यासारखं वाटूं लागतं. हे सूर्याचे कोंवळे किरण नव्हेत, हीं गुलाबाचीं फुलं नव्हेत, तर हें प्रेमच जगभर पसरलं आहे असं वाटतं. गुलाबफुलाच्या रूपानं हें प्रेमच फुललं आहे असं वाटतं !

**सोकाजी**—असेल ! पण लाडके, मला यांतलं कांहींच दिसत नाहीं माझी नजर फक्त एकाच काळ्याभोर केशकलापावर, एकाच मादक नजरेवर, एकाच ह्या फुलत्या खुलत्या गुलाबफुलावर खिळली आहे ! हे काय बरं लाडके ? अजून-सुद्धां आपल्यामधला परकेपणा समूळ नष्ट झाला नाहीं का ? हा असला परकेपणा.........

**गौरी**—परकेपणा नव्हे हो; पण......पण......कां नाहीं, चढत्या दिवसा-च्या तापानं प्रसन्नता कमी होऊन मनाची ग्लानि जशी जशी वाढत जाते तसतसे त्याला भलभलते विचारही सुचूं लागतात. रागावूं नका. पण आपण करतों हें चांगलं का, असा प्रश्नसुद्धां कधीं कधीं मनापुढं उभा राहतो. एखादं कृत्य करायला लागण्यापूर्वी मनाची जी हुरूप असते, ती तें कृत्य प्रत्यक्ष करायला लागल्यानंतर कां बरं कायम राहूं नये ? आपण कोण—

**सोकाजी**—हं, समजलों मी. आतां आलं माझ्या लक्षांत. मी कोण ? हा प्रश्न अजूनही तुझ्या मनाला डांचतो आहेसा दिसतें. मीं तुला माझी सर्व हकीगत सांगितली ती तुला खोटी वाटते ! नशीब माझं !

**गौरी**—ती मी खोटी नाहीं हो समजत—

**सोकाजी**—तरी पण यापेक्षांही तिच्याबद्दल तुझी अधिक खात्री व्हायला पाहिजे आहे, खरं ना? तर मग तुझ्याकडे पाहुणा आलेल्या त्या कवीश्वरालाच विचार. तो आणि मी एकाच कॉलेजांतले विद्यार्थी. मोठा टापटिपीचा, पद्धतशीर विचार करणारा आणि प्रेमाचीमुद्रां कसोटी पाहणारा तो मनुष्य आहे. परंतु श्रीमंतांना साजेसा एकही गुण बेटयाच्या अंगीं नसल्यामुळं त्याचं माझं सूत केव्हांच फारसं जुळलं नाहीं. तरी त्याला माझ्या घरची सारी खडान खडा माहिती आहे. मी सुवर्णपूरचा जहागीरदार असून तिथें माझा मोठा वाडा आहे, बागबगीचे आहेत कीं नाहींत हें तोच तुला सांगेल. आमच्या घरच्या बायका तुझ्या आई-पेक्षांही अधिक दागदागिन्यांनीं फुलले या असतात कीं नाहींत; गाडयामोटारींतून त्या स्वेच्छ हिंडतात कीं नाहींत; बायकांना तनखा तोडून दिल्यामुळं पुरुषांजवळ पैसे मागण्याची त्यांना जरूरच कशी लागत नाहीं; सारी सारी हकीगत तो तुला बरोबर सांगेल माझं आपलं प्रेमवेड्याचं मत तुला सांगायचं म्हणजे खऱ्या प्रेमाला या असल्या चौकशांची मुळीं जरूरच नसते.

**गौरी**—नसते खरीच. पण-पण-त्या बायकांना खरेंखुरें संसारसुख मिळत आहे कीं नाहीं; पतिपत्नी असलेल्या जोडप्यामध्यें भांडणतंटे नसून दोघांचं एकमेकावर खरंखुरं प्रेम आहे कीं नाहीं, असले प्रश्न आपले सारखे मनापुढं येतात हो. तुम्हीं सांगितल्यातना त्या बहुतेक गोष्टी, अगदीं लहान प्रमाणावर खऱ्याच, पण आमच्याही घरांत आहेत. तरी बाबांना आणि आईला तिळमात्र तरी खरं सुख आहे का? संसार म्हणून कांहीं आहे, कुटुंबांत कांहीं तरी पद्धत म्हणून असावी लागते, असल्या गोष्टींची आजवर कीं नाहीं मला मुळीं जाणीवच नव्हती. पण किनई घरांत माझे आजोबा आल्यापासून आणि विशेषेंकरून बाहेर शेजारीं ते कवीश्वर राहूं लागल्यापासून—

**सोकाजी**—ऊं! तो भिकारडा कवीश्वर! तो तुला श्रीमंत संसाराची, श्रीमंत कुटुंबाची, श्रीमंत स्त्री पुरुषांच्या जोडप्याची कल्पना देणार!

**गौरी**—भिकारडा कां बरं? पण नुसता श्रीमंत असून तरी काय उपयोग? पुरेशी श्रीमंती असूनही माझ्या आईबापांना खरं सुख मिळत नाहीं; तेव्हां केवळ श्रीमंतीवर का प्रेम अवलंबून आहे? असं कवीश्वरांनीं त्या दिवशीं विचारलं त्याचं काय उत्तर?

**सोकाजी**—पण आकाशाप्रमाणं अमर्याद असलेल्या प्रेमाचं मोजमाप करणारा तो, त्याला प्रेमाची काय कल्पना? प्रेम तें प्रेम! लाडके, त्याला संसाराचं बंधन नाहीं; फार काय, खरं सांगायचं तर प्रेमाला विवाहाचंसुद्धां बंधन नाहीं; प्रेम तें प्रेम! तुझ्यामाझ्यामधें आहे तेंच खरं प्रेम.

**गौरी**—हें पहा किनई, असल्या विचारांनीं माझ्या मनाचा आतांशा भारीच बाई गोंधळ उडतो; आणि त्याला कांहीं सुचेनासं होतं. खऱ्या प्रेमाला विवाहाचं-सुद्धां बंधन नाहीं म्हणतां?

**सोकाजी**—अलबत! कोणतेंही बंधन आलं कीं तें खरं प्रेमच नव्हे. इतकंच काय; लाडके, प्राणवल्लभे, एकदां तूं माझी झालीस, म्हणजे तूं काय करतेस—कुठं जातेस—किती बोलतेस,—काय बोलतेस—याची मी बिलकुल चवकशी करणार नाहीं. मग तुला उलटून बोलणं अगर तुझ्याजवळ भांडण करणं तर दूरच! लाडके, तूं माझी देवी आणि मी तुझ्या पायांचा दासानुदास!—(गुडघा टेंकून ओंच्याचें चुंबन घेतो.)

**गौरी**—(विव्हलतेनें त्याच्या मस्तकावर हात ठेवावा कीं नाहीं अशा संदेहांत—स्वगत) आहाहा! कुठं यांचं हें अनिर्बंध प्रेमाचं समर्पण आणि कुठं कवीश्वरा-ची निर्बंधांनीं युक्त अशी विवाहाची याचना! यांचा हा अनन्यभाव पाहून हे प्रेमी सोकाजीरावच बरेसे वाटतात. कवीश्वर अनेकदां असे भेटले; पण अशा तऱ्हेचा हा आविर्भाव एकदां तरी दाखविला का त्यांनीं? आणि सोकाजीरावांचा असा भक्तिभाव पाहिला म्हणजे हृदयाला कसा तत्काळ पाझर फुटूं पहातो. अशा वेळीं मनाचे सारे विकल्प वितळून जातात आणि—आणि (मस्तकाला हस्तस्पर्श करण्यासाठीं हात जवळ नेते. पण सोकाजी बोलतो—इतक्यांत मागें घेते.)

**सोकाजी**—~~मर्ली~~ माझ्या जिवाभावा, नाहींच ना अजून तुझ्या हृदयाला पाझर फुटत? तुझ्याशिवाय आतां मी जगणंच शक्य नाहीं. गौरी! मला मारणं कीं तारणं-प्राणवल्लभे, आतां सर्वस्वीं तुझ्याच हातांत! (उठून) दे. दे तो तुझा हात इकडे! कां वरं असा मागं घेतेस! पहा, पहा, तो माझ्या हस्तस्पर्शा-साठीं पुढं होऊं पहात आहे. पण तूंच त्याला—हं! दे तो इकडे. (हात पुढें करतो, तीही चांचपडत धरते, इतक्यांत पडद्यांत 'गौरे, ए गौरे' अशी हांक ऐकून तो ती मागें घेते.)

**गौरी**—अगबाई ! आजोबाच हांक मारताहेत वाटतं !

**कर्कशराव**—( पडद्यांतून ) गौरे, ए गौरे; कुठें गेली ही कारटी ! सकाळच्या प्रहरीं अंग धुवायचें, तुळशीला पाणी घालायचें तें सोडून कुठें गेली ही भटकभवानी ! ए गौरे, चल कुठें आहेस ती, इकडे ये पाहूं !

**गौरी**—जा तुम्ही. आजोबाच हांक मारीत आहेत, गेलंच पाहिजे मला आतां. नाहीं तर काठी टेंकीत टेंकीत इकडेच यायची स्वारी !

**सोकाजी**—सख्खे आजोबा का तुझे ? त्या दिवशीं तूं म्हणालीस ते हेच तुझ्या मनाविरुद्ध बोलत असतील, आणि मग भांडणाचा आणि वितंडवादाचा प्रसंग येत असेल !

**गौरी**—हेच काय, आणखी पुष्कळ मंडळी आहेत—

**सोकाजी**—तो कवीश्वरसुद्धां आणीतच असेल मोठा उपदेशाचा आव; मला ठाऊक आहे त्याचा स्वभाव. तुझ्या प्रातीसाठीं तुला वाटेल तें सांगेल तो; पण त्याच्याकडे तूं लक्षच देऊं नको अं !

**गौरी**—जा, जा आतां तुम्ही. पुन्हा याल त्या वेळीं सारं सांगेन तुम्हांला केव्हां याल आतां पुन्हा ?

**सोकाजी**—येईन परवां संध्याकाळीं सहा वाजतां. मन मोकळं बोलायला सांपडावं म्हणून बाहेरच्या एखाद्या बागेंत फिरायला जाऊं-अर्थात् जमल्यास-आणि त्याला तुझी हरकत नसल्यास—पण कशाची हरकत !

**कर्कशराव**—( पडद्यांत ) अग गौरे, कुठें आहेस ती ? येतेस कीं नाहीं इकडे लौकर !

**गौरी**—जा, जा आतां, ( बोलूं नका अशी खूण करते. सोकाजी तिचेकडे पहात पहात जातो.) अहाहा ! इतक्या गाड्या, मोटारी, इतके दागिने, बागबगीचे, दासदासी आणि दासानुदासाप्रमाणं माझ्या सर्वस्वीं कह्यांत वागणारा प्रेमाचा मूर्तिमंत पुतळा असलेला सोकाजीरावांसारखा पति—खरोखर इतकं असेल का माझं भाग्य ! अहाहा ! (गुंगते.)

**कर्कशराव**—( पडद्यांत ) कुठें गेली कारटी ! गौरे—

**गौरी**—( भानावर येऊन ) आजोबा-पण आजोबाच काय जमूं देतील तें खरं ! आल्यापासून फुरसत म्हणून कुणाला मिळूं देत नाहींत. साऱ्यांना कसं अगदीं धारेवर धरलं आहे. आई त्यांना मुद्दाम चिडवण्याकरितां हट्टाहट्टानं हा

वेळपर्यंत निजून राहिली होती, ती अजून तरी उठली की नाहीं कुणाला ठाऊक? तिला जर का आजोबांनीं अजून निजलेली पाहिली तर कडकडाट उडवतील ग बाई! ते पुढच्या दारीं आहेत. आपण आपलं आतां दुसऱ्या दारानं जावं आणि आंग धुंऊन मागल्या दारीं तुळशीपुढें बसावं. [ जाते.

---

## प्रवेश दुसरा

[ **स्थळ**—बंगल्यापुढील बागेचा भाग–एका बाजूनें लपत छपत **गौरी** आंत शिरण्याचा यत्न करते. समोरच **कर्कशराव** स्नानानंतरच्या वेषांत काठी टेंकीत येतो ].

**कर्कशराव**—तास वाजे ठणाणा। राम कां रे म्हणाना॥ ( पाहून ) इथेंही कुठें दिसत नाहीं कार्टी! आणि इतक्या हांका मारल्या तरी अजून टवळी आली नाहीं! बागेंत कुणा सोकाजीची टवळी भेट घेते अशी चाकरमाणसांत कुजबूज ऐकली. तो सात मुलुखाचा लुच्चा कवीश्वर, आहे तिच्या पाळतीवर. तो नाहीं तिला असा भलत्यासलत्याची गांठ घेऊं द्यायचा. [ गुलाम स्वतःच झाला असेल सोकाजी! असेल कशाला! तोच तो. मी बघतोंच आहें सारें. आहे, हुशार आहे बेटा! अगदींच पुस्तकी नाहीं आणि या आमच्या रायासारखा बुळाही नाहीं! आणि त्या आचरट पोरीच्या डोळ्यांलाही चांगलें अंजन मिळायास हवें पण गुलामांनों, लक्षांत ठेवा! इतकें करूनही तुम्हीं आपलें मेतकूट जमवलें नाहींत तर या कर्कशरावाशीं गांठ आहे! त्यानें तुमच्या लग्नाची गांठ मनांत अगोदरच पक्की मारून ठेवली आहे, आणि म्हणूनच तो तुमचे हे थेर चालूं देतोय्. ( उघड ) गौरे, ए गौरे! [ पहात फिरतो ].

**गौरी**—गुपचूप आंत जायचं,पण आजोबा अगदीं पहारेकऱ्यासारखे दाराशींच उभे! त्यांना टाळून मी एकदांची आंत कशी जातें? [ छे:! वळलीच त्यांची नजर इकडे! आतां कसली माझी सुटका! पुढं होऊन आजोबांना नमस्कार ठोकावा झालं; म्हणजे थोडा तरी राग शांत होईल. ( कांपत भीत भीत पुढें येऊन ) नमस्कार करतें आजोबा!

**कर्कशराव**—अगो, अगो, शिवशील गो. दूर दूर ! लांबूनच नमस्कार कर हो ! अनुरूपवरप्राप्तिरस्तु ! काय गो टवळ्ये ! कुठें गेली होतीस सकाळच्या प्रहरीं आणि काय करीत होतीस तिकडे ? इतका शंखनाद केला, ओ कां दिली नाहींस ? एरवीं कशी जीभ चुरुचुरु करते ! कान फुटले का तुझे ? आणि आईस कुठें आहे तुझी ! बोल, काय करते आहे घिसाडीण ?

**गौरी**—निजली आहे.

**कर्कशराव**—निजली आहे ! नऊ वाजले तरी अजून झोपा ताणते आहे ! बेशरम बायको कुठली ! घरांत भाजीपाल्याकडे पहायला नको, कश्शाकडे पहायला नको आणि पासलं पडायास हवें ! पुजेचें कुणीं पहायचें ! लग्नाला तूं एवढी घोडी झालीस आणि ह्या बेरड बायकोला झोंप कशी येते ?

**रागिणी**—( नेसूं रेशमी लुगडं आणि नुकतीच उठलेली अशी डोळे चोळीत येते.) बाई ! बाई ! बाई ! बाई ! एवढा तणतणाट कशाला तो ! आत्तांच का तिचं लग्न लावायचं आहे ?

**कर्कशराव**—( तिच्याकडे दुर्लक्ष करून ) पहा, पहा ! आणि निजली ती कशी ? रेशमी वीतभर कांठांचें लफ्फेदार लुगडें नेसून ! वा रे वा ! नोकरांवर नजर ठेवायची नाहीं आणि स्वतः अशी उधळपट्टी !

**रागिणी**—मग ? माझ्या नवऱ्याचंच ना उधळतें मी ?

**कर्कशराव**—मी आहें तोंवर नाहीं चालायच्या ह्या तुझ्या गमजा ! उद्यां जर का पहांटेस उठून कामाला लागली नाहींस—

**रागिणी**—आम्हीं कामं करायचीं मग नोकर कशाला ते ?

**कर्कशराव**—चोऱ्या करायास ! त्यांना चांगल्या कामांत तुझें वळण नाहींच; पण असल्या चोऱ्या करण्यांत......नवऱ्याच्या पश्चात् खिशांतून आणि तिजोरींतून पैसे आणि जिनसा लांबवून त्यांना तूंच धडा घालून दिला आहेस !

**रागिणी**—मग ? मीं घेतलं किंवा त्यांनीं चोरलं तरी सारं माझ्याच नवऱ्याचं आहे !

**कर्कशराव**—थांब, तुझें कंबरडें चांगलें मोडल्याशिवाय तुझा दिमाख उतरायचा नाहीं आणि शिस्तही लागायची नाहीं. काय गो, एवढी एरंड वाढलीस, परवांपासून दहा वेळां हा तुझा वयोवृद्ध सासरा—तुझ्या नवऱ्याचा पिता आणि पोरींचा पितामह पुढें आला; पण त्याला नमस्कार

करायचें तुझ्या टाळक्यांत आलें नाहीं! एकदांसुद्धां तुझें कंबरडें वांकलें नाहीं! मोडलें तुझें पेंकाट तें! चालरीत पारखी आणि माजली आहे नुसती म्हशीसारखी—

**रागिणी**—काय हें बोलणं तरी? म्हटलं माणसांचं घर आहे हें! कांहीं म्हशींचा गोठा नव्हे

**कर्कशराव**—गाढवांचें आवार आहे, गाढवांचें आवार! कसलें घर हें? दिवसभर गाढवांचा गोंधळ आणि लाथांचा सुकाळ! शिव! शिव! ह्यांत राहण्यापेक्षां भुताखेतांच्या मसणवटींत रहाणें बरें! नाम वाजे ठणाणा। राम कां रे म्हणाना॥

**रागिणी**—मग म्हणावं एकदांचं राम आणि जावं आतांच तिकडे रहायला! म्हातारचळ लागून डोकं फिरायची वेळ आली—

**कर्कशराव**—नाहीं. तुझें मुस्कट फिरायची वेळ आली आहे खरी! सासऱ्याचें मढें मसणांत पाठवायला तयार झालीस; पण अजून तें चालतें बोलतें चांगलें सणसणीत आहे! त्याला नमस्कार नाहीं केलास!

**गौरी**—बाई-बाई-बाई-बाई! आजोबा कसले हे? शुद्ध जमदग्नीचा अवतार! आईला कशाचे ते बोलूं देतात! (रागिणीला—एकीकडे) आई, आई, ~~कर ना ग नमस्कार.~~ भलताच एखादा प्रसंग येईल हो! ~~कर ना.~~ त्यांत काय आहे मोठंसं!

**रागिणी**—(एकीकडे) चूप रहा तूं. पाहूंच दे मला एकदांचं काय करतात तें!

**कर्कशराव**—काय सूनबाई, कानांत किडे पडले वाटतें? कां कोंकणचा बहिरोबा शिरला आंत? ऐकायला नाहीं आलें, मी काय म्हणतों तें! करतेस कीं नाहीं सासऱ्याला नमस्कार?

**रागिणी**—हातांत आली काठी आणि साठी बुद्धि नाठी! [ जाऊं लागते.

**कर्कशराव**—आणि तीच बसेल तुझ्या पाठीं. चाललीस कुठें? साठी बुद्धि नाठी असली तरी मोठीं तीं मोठीं. पड, पड माझ्या पायां. चामुंडा कुठली. कर नमस्कार.

**रागिणी**—काय तोंड! काय तोंड! काय तोंड!

**कर्कशराव**—काय थोबाड ! काय थोबाड ! काय थोबाड ! चल, वांक खालीं ! ( कान धरायला जातो.)

**गौरी**—आजोबा, आजोबा ! ( हात धरायला पुढें होते. तो थांबतो.) आई, असं ग काय करतेस ? कर ना आजोबांना नमस्कार !

**कर्कशराव**—सूनबाई, करतेस कीं नाहीं नमस्कार ? ( जवळ जातो.)

**रागिणी**—हे काय ? हें असं अगदीं अंगचटीला यायचं ! सुनेनं सासऱ्याच्या घरीं जायची आजवरची जगाची चाल, पण सासरोबानं माझ्याकडे येऊन सुनेवर चाल करण्याची रीत पाहिली नव्हती बाई !

**कर्कशराव**—चूप ! तोंडांतून अक्षर काढशील तर दांत पाडून टाकीन ! मी कांहीं तुझा नवरा नाहीं बोटावर नाचवायला ! बुळ्या तो राग्या, तोंडाला तोंड द्यायचें त्याच्या, माझ्यापुढें तुला नाकच घांसलं पाहिजे. आल्यापासून सारखा पहातों आहें. दादला बायको म्हणजे तबला-डग्ग्याची जोडी—हूं तर म्हणे हूं ! जोडीला आणखी या कारटीचं पिपरें ! परवां पाहुणीं आलीं तीं तशींच डफ-डमरू आणि वाजवतात साऱ्या मिळून मकाणभर बेंडबाजा ! संसार करीत आहेत संसार ! वांकणें कसें तें कुणाला ठाऊक नाहीं. नाक घांसायला लावून मी शिकवतों तुला ! करतेस कीं नाहीं नमस्कार ? ( कान धरून ) वांक, वांक खालीं आणि कर नमस्कार.

**रागिणी**—मामंजी, हात जोडतें तुम्हांला अगदीं कोंपरापासून.

**कर्कशराव**—नाहीं ! 'मामंजी, नमस्कार करतें' असें सुधें बोल. ( ती तसें म्हणते.) अष्टपुत्रा सौभाग्यवती भव. [ **रागोपंत** प्रवेश करतो.] राग्या, अगदीं वेळेवर आलास. चल इकडे ये असा आणि बायकोला कशी ताब्यांत ठेवायची तें नीट पहा. अरे, पोर गळ्याशीं आली तिच्या लग्नाचा विचार करायचें सोडून खुशाल झोंपा ताणीत पडते. तिला चांगली जागी केली आहे. बसा दोघें आणि लग्नाचें काय तें नक्की करून टाका. काय ग, ए कारटे, अंगधुणें झालें कीं नाहीं ? चल, निघ इथून. तो वक्रतुंड्या भाजी घेऊन आला कीं नाहीं, तें मी पाहतों तोंवर अंग धुऊन तुळशीला पाणी घाल.

[ जातो. मागें गौरीही जाते.

**रागिणी**—मामंजी ग बाई मामंजी ! सारं घर कसं डोक्यावर घेतलं आहे त्यांनीं ! इतके दिवस नुसता तोंडाचाच ढाम-ढोल वाजत होता. आतां

हातघाईवर यायला आरंभ झाला. सासरे झाले म्हणून काय झालं ? सुनेच्या अंगावर हात टाकायाचा !—

**रागोपंत**—तो तुझ्या हिताकरतांचना ! काय वाईट सांगितलं त्यांनीं ? चांगलं पहांटे उठावं, संसाराकडे लक्ष द्यावं—मलाही त्रास झाला नसता आणि गौरीचं केव्हांच लग्नही होऊन गेलं असतं !

**रागिणी**—हो ! दोन मुलंसुद्धां झालीं असतीं तिला. पण तुम्ही एक भांड-खोर तर वडील आले ते सात भांडखोर ! बेटासे बाप सवाई !

**रागोपंत**—बाबांच्याविषयीं असं बोलतेस ! आले, फार चांगलं झालं. इतके दिवस कुणी सांगसवर करायला नव्हतं—

**रागिणी**—यासाठींच थेरड्याला आणलांत वाटतं ! तरी म्हटलं सांग नाहीं सवर नाहीं आणि एकदम असे भुतासारखे येऊन उभे राहिले कसे ?

**रागोपंत**—पुरे झाला म्हणतों ना तो विषय. थोडी फुरसत आहे तर गौरीच्या लग्नासंबंधानं चार शब्द बोलूं.

**रागिणी**—आतांच नाहीं ना कोणी बाशिंग बांधून उभा राहिला ! आधीं बायको कीं बाप ह्या प्रश्नाचा निकाल ! हें पहा, इतकीं वर्सं आपण एके ठिकाणीं आयुष्य कंठलं—

**रागोपंत**—आयुष्य काय ? एखादा गटारघाण्या डुक्करसुद्धां आपल्या लाडकी-सह वर्षानुवर्षं कंठीत असतो.

**रागिणी**—पण हा मामंजींचा ब्रह्मसमंध घरांत शिरल्यापासून आपलं बस्तान अगदीं बिघडलं आहे. घटकाभर पाय लांब करून बसायची सुद्धां चोरी झाली आहे मला ! नोकरांना नाहींच, नवऱ्याजवळही मी बोलायचं नाहीं—~~नवऱ्याकडे जायचंसुद्धां~~ नाहीं मीं !

**रागोपंत**—असं कधीं म्हटलं बाबांनीं ! नवऱ्याजवळ फक्त भांडायचं नाहीं. बरं, गौरीचं ठरवायचं का कवीश्वराशीं लग्न ?

**रागिणी**—वडिलांची आतांच्या आतां करायची ना कोंकणांत रवानगी ? इतके दिवस नव्हते, आतांच कशाला हवेत जवळ ते ! म्हातारपणीं कोंकणांत हरिहरि करीत बसावं तें सोडून, 'राम कां हो म्हणाना' म्हणून ठणाणा करीत इथं आले ! राहिले चार दिवस; जाऊं द्या आतां धिडका परत !

**रागोपंत**—दिवसेंदिवस पहावं तर तूं अगदींच बेसुमार होत चाललीस !

साऱ्या आयुष्यांत बाबा हे प्रथमच आपल्याकडे आले; त्यांना मीं रहायचा आग्रह करायचा कीं जा म्हणायचं ! लोक काय म्हणतील ?

**रागिणी**—झक् मारतात लोक ! एकूण माझ्यापेक्षां तुम्हांला बाप आवडतो. बापाशीं कसा भांडूं–असंच ना ? ठीक आहे. बाप हवा तर मग तो घरांत असेतों मीच आपली माहेरीं निघून जातें.

**रागोपंत**—त्यापेक्षां गौरीच्या लग्नासंबंधीं चार गोष्टी बोलेनास.

**रागिणी**—हें पाहिलंत ! मी माहेरीं जायचं म्हणतें; पण तुम्ही कुठले धाडायला ! हो, गेल्यें म्हणजे मग मला सारा दिवस छळायला कसं मिळेल !

**रागोपंत**—तर मग हो चालती माहेरीं ! मला चार दिवस विश्रांति तरी मिळेल. पण जा म्हणून म्हटलं तरी तूं कुठली जायला ! मग तिन्हीत्रिकाळ नवऱ्याजवळ भांडायला कसं सांपडेल ? जा, हो चालती याच पावलीं !

**रागिणी**—हो, तुम्ही म्हणायचेच जा म्हणून ! मुळीं मी नकोशीच झालें आहें तुम्हांला ! देवा रे देवा ! असा कसा माझा अगदीं दोन्हीकडून छळवाद मांडला आहे तुम्हीं !

**रागोपंत**—हा छळवाद तुझा कीं माझा ? अरे राम, राम, राम ! आतां मीच जातों संन्यास घेऊन काशीला !

**रागिणी**—कांहीं नको, बसा इथंच वडिलांना कवटाळून संसार करीत. ते बाप तुम्ही पुत्र ! मी बायको थोडीच तुमचा बाप आहें. पण म्हटलं, बाप कितीही मायेचा झाला तरी तो बायको व्हायचा नाहीं ! मग काय ? बायको कीं बाप ? बापचना ? तर मग ही चालली बायको घर सोडून !

[ जाऊं लागते–समोरून **कर्कशराव** गांठोडें हातांत घेऊन येतो.]

**कर्कशराव**—तयारीच आहे, बाईसाहेब. परवांची बांधलेलीच आहे गठडी तुझी. हो चालती, अश्शी ह्याच पावलीं चालती हो. रागया, गधड्या अगदींच कसा रे तूं तोंडबायल्या ! तुझा बाप काय शंभु नंदन आहे म्हणून त्याच्या पोटीं तूं शंभु निपजलास ? जा, रांड्याराघोजी, हिचें मडकें धर आणि दे पोहोंचवून हिला आगिनगाडींत ! और्ध्वदेहिक सांगायला मी येतों हवा तर बरोबर. चला सूनबाई, ऐकत होतों मी. सांगून गेलों, पण मुलीच्या लग्नासंबंधीं आतांपर्यंत चकार शब्द तरी ! लाग चालायला, कीं मोडले आतां पाय ? आणूं का तिरडी बांधून ?

**रागिणी**—तुम्ही सारीजणं मला ढीग घालवाल, पण मी बरी जाईन म्हटलं शेणामेणाची बाहुली नाहीं !

**कर्कशराव**—चूप, कोंकणच्या फेरीबोटीची शिट कुठली ! सासऱ्याला कोंकणांत पोंचवायला तयार झाली आहे ! चल-निघ इथून.

**रागोपंत**—बाबा, बाबा—

**कर्कशराव**—चूप बायल्या ! तुला आवरतां येत नाहीं आणि हवी कशाला बायको ! राहवत नसलें तर तूंही चालता हो तिच्या मागें.

**रागिणी**—पहावत नाहीं तुम्हांला ! ( लांब सुस्कारा टाकून ) हूंः ! शनि आला घरा आणि धनी झाला पाठमोरा ! समजला आपला नवरेपणा ! मी तुम्हांला निक्षून सांगतें, कीं हा ब्रह्मसमंध घरांत असेतों इथं मी पाणीसुद्धां ध्यायची नाहीं ! मामंजी भांडखोर असले. तरी सूनबाईही कांहीं कमी भांडखोर नाहीं. जातें आणि रहातें बंगलींत स्वतंत्र ! तिथं माझी व्यवस्था सारी बिनबोभाट झाली पाहिजे.

**कर्कशराव**—तें क्रियाकर्मांतर मी जाऊन करतो ! खबरदार तिच्या मागें येशील तर ! हो चालता घरांत !

[ स्वतः रागिणीच्या मागें जातो. रागोपंत लांब सुस्कारा सोडून दुसऱ्या बाजूनें जातो.]

---

## प्रवेश तिसरा

[ **स्थळ**—बाग. **कवीश्वर** एकटाच आहे.]

**कवीश्वर**—( स्वगत ) बापरे, काय हीं या खडाष्टकांतील एकापेक्षां एक भडक पात्रं ! पण तीं आहेत तशींच मला रंगविलीं पाहिजेत ! संसारसौख्याचीं चित्रं रंगविण्याचे निसर्गाच्या रंगप्याल्यांतले कांहीं कांहीं रंगच मोठे भडक असतात, त्याला मी काय करूं ! पण—गौरी—तिचं चित्र रंगविण्यांत माझी कांहीं चूक नाहींना होत ? छे ! छे ! कांहीं दोष सुधारल्यावर, गौरी बऱ्यापैकीं माझी नायिका झाली पाहिजे. लहानसान दोष कुणांत नसतात, आणि त्यांच्याकडे दुर्लक्ष केल्याशिवाय कसं चालेल ? गुलाबाचा वास पाहिजे तर कांटयांचा किंचित् त्रास सोसला पाहिजे. शिवाय गौरीच्या दोषांची जबाब-

दारी तिच्यापेक्षां तिच्या आईबापांकडेच जास्त येते. झाडाच्या फांद्या एक-मेकांवर घांसल्या म्हणजे झाडच पेटतं असं नाहीं; खालच्या रोपट्यांना सुद्धां त्याची धग लागायचीच ! फंदी नसली म्हणजे माझ्यासारख्या लेखकाला अशी जरा छंदीच बायको बरी ! तिला शक्य तेवढी दोषरहित करायची.— त्याला उपाय मीं चालविलाच आहे. आतां खडाष्टकांतील बाकीचीं पात्रं ! इथं नुसतं उपदेशाच्या सांगोसांगीनं काम भागायचं नाहीं. कारण गांठ आहे मुख्य बायकांशीं. त्या आधीं कशाला आरंभ करायच्या नाहींत, आणि एकदां केला म्हणजे चांगली अद्दल घडल्याशिवाय शेवटही करायच्या नाहींत ! तेव्हां वेळ येईल तशी वात सारून या साऱ्या कलहाच्या दिवट्या भडकवल्या-शिवाय त्या कायमच्या विझायच्या नाहींत. ( पाहून ) ही दिवटी इकडे कशाला आली ? [ **गर्गशा** येते.] हिचा रोंखही माझ्यावरच दिसतो. ( दोघें एकमेकांकडे पहात राहतात. )

**गर्गशा**—( स्वगत ) केव्हांही दृष्टादृष्ट झाली म्हणजे हे माझ्याकडे असेच कौतुकानं पहात राहतात. मला यांच्याविषयीं थोडीबहुत आशा वाटते, ती तरी यामुळंच. नाहीं; कवि हे फार लहरीवाईक असतात, असं आपलं ऐकलं आहे. प्रसंगीं यांची आवडनिवड कां आणि कुठं वाहवेल—हो; माझ्या-कडेही वळणार नाहीं कशावरून ? आपण आपला यत्न करून पहावा. नाहींच जमलं तर आहेतच वक्रतुंड नशीबाला लागलेले ! ( खालीं मान घालून उकिडवी बसून मोठ्यानें ) माझं नांव गर्गशा.

**कवीश्वर**—तें आपलं जगप्रसिद्ध नांव ऐकून माझे कान पूर्वीच पवित्र झाले आहेत ! आतां तें मुद्दाम मला सांगून हें तूं चालवलं तरी काय आहेस गर्गशे ?

**गर्गशा**—दाखवितें आहें मी स्वतःला. मुलगी फार वाढली, लग्न होईना, ताईसाहेबांना आल्यागेल्याला दाखवायला यजमान आहेत, तसं मला कुणी नाहीं. म्हणून पाहिलींत तर दाखवितें आहें मी स्वतःलाच.

**कवीश्वर**—अस्सं ! अस्सं ! एकंदरींत तूं मला सांगून आली आहेस म्हणायची !

**गर्गशा**—हो, तुम्ही लग्नाला आलेले तरुण—

**कवीश्वर**—पण गौरीच्या—



**कवीश्वर**—हें तूं चालवलंस तरी काय गगंशे ?

[ पृष्ठ ५५.

**गर्गशा**—तिचं जुळतं आहे कुठं आणि कुणाजवळ! मोठी ढालगज मुलगी आहे हो ती! पुष्कळजण तिला पहायला येतात; पण ती स्वतःला कुणाला दाखवीतच नाहीं. मग पत्करणार कोण? तुम्हीही पत्करूं नका. रागोपंत-रागिणी हीं नवराबायको दोघं सारखींच भांडखोर आहेत, असं चुकून कुठं वाम्काकी बोलल्या वाटतं; जातां जातां तें गेलं गौरीच्या कानावर आणि आईला तेवढं सांगायलासुद्धां ती चुकली नाहीं. अशी मोठी चुगलखोर आहे ती! तिच्याशीं लग्न करून फसाल आणि मग रडत बसाल. कांहीं विशेष असं तिच्यांत नाहींना? आणि असलं तरी माझ्यात सुद्धां आहे हो!

**कवीश्वर**—गौरीसारखा भांडखोरपणासुद्धां?

**गर्गशा**—हो, तुम्हांला हवा असला तर आहे. नको असला तर नाहीं. अशी कुणालाही जुळणारी बहुढंगी बायको आहें मी! म्हणून तुम्हांला लग्नच करायचं झालं तर गौरीपेक्षां चांगल्या मुली इथं आहेत, हें कळविण्याकरितां आपली दाखवून ठेविली आहे तुम्हांला मी!

**कवीश्वर**—पाहून ठेविली आहे मीं पण तुला. येईल त्याला दाखवून हो तूंच माझा दादला, म्हणून म्हणणारी तुझ्यासारखी छुन्नकतारा—(ती उभी राहून मुरकते) हं! अशी मुरडूं नकोस! कुणाला बरं आवडणार नाहीं?

**गर्गशा**—मग पसंत पडलेंच म्हणायची तुम्हांला मी! आतां कधीं याल मला रीतसर मागणी घालायला? लवकरच या हो! जाऊं आतां मी?

**कवीश्वर**—जा; हळू ये बरं!

**गर्गशा**—(जाऊन परत येऊन) पण आवडलें ना तुम्हांला मी? आतां नाहींना मनांत त्या ढेम्या गौरीचा विचार येत?

**कवीश्वर**—नाहीं; नाहीं. जा इथून एकदांची.

**गर्गशा**—(जाऊन पुन्हा येऊन) मग आतां घालायची ना मलाच मागणी?

**कवीश्वर**—आतां काय करावं? माझे आई, तूं म्हणशील तें करीन, पण जा एकदांची निघून.

**गर्गशा**—जाऊं? (जातां जातां) जातें बरं! गेलें बरं! लौकर या बरं! याल ते मागणी घालायलाच या बरं! आणि मागणी घालाल ती मलाच घाला बरं! [जाते.

**कवीश्वर**—होय बरं ! नाहीं बरं ! बरं बरं ! गेलीस का बरें ! सुटलों बरं ! ( लांब सुस्कारा सोडून ) आई ! आई ! आई ! आई ! हिनं तर अगदीं कासावीस करून घामाघूम केलं मला. ( पाहून ) बापरे ! हिच्या तडाक्यांतून सुटलों नाहीं तोंच हा आला रागिणीकाकूंचा फेरा. कशाला येते आहे इकडे ? हं; गर्गशेनं आतांच सांगितलं, त्या आईच्या घोर अपराधाबद्दल तिचा समाचार घ्यायलाच येत असावी बहुतकरून काकूंची स्वारी. ती येण्यापूर्वी आधींच जाऊन ठेवूं का आईला सावध करून ? पण आईच आली इकडे. [ **वारूबाई** रडक्या तोंडानें येते ] काय ग आई झालं ? असं अगदीं रडवेलं कां तुझं तोंड ? सांगना बरं ?

**वारूबाई**—करायचं काय सांगून ? कुणी लक्ष देईल तर सांगण्याचा उपयोग. त्यांच्याजवळ अवाक्षर काढायची सोय नाहीं आणि तूं प्रहरानुप्रहर भेटतही नाहींस. सारा दिवस बाहेर करतोस तरी काय ?—कधीं घटकाभर घरांत पाऊल टिकलंच तर तूं आपला आपल्याच नादांत गुंग. आईस मेली का गेली-आठवण तरी होते ? मीच कपाळकरंटी ! खेड्यांतून शहरांत आलें किंवा पाताळांतून स्वर्गांत गेलें तरी माझ्या कपाळीं रड ती रडच ! आजचे आज मला भांडखेड्याला पोहोंचती करून दे.

**कवीश्वर**—नाहीं ग आई—

**वारूबाई**—नाहीं तर काय रे ? म्हटलं इथं येऊन चार दिवस तरी मागच्या कामाचा त्रास चुकेल. पण रामा शिवा गोविंदा ! कामाची ढुंकणी आणि हातांत फुंकणी, आपली जन्माची आहे ती आहेच. पाहुणीं आलों मोठ्या श्रीमंताकडे, पण यजमान कसे भेटले रांडेच्यांनो ! एक दिवस जेवायलासुद्धां का रे घालूं नये त्यांनीं ! एखादा दिवस तरी कपाळाचं धुणंपाणी आणि चूलपोतेरं चुकायचं होतं ! माझी ग्रहदशाच तशी आहे. मग रडूं नाहीं तर काय करूं ? जें घरीं, तेंच दारीं ! मग मी चांगली नको म्हणत होतें तर त्यांचं तरी इथंच येऊन बसायचं काय अडलं आहे कुणाला ठाऊक ? ( तो हंसतो. ) दांत काढून हंसतोस रे काय मेल्या ! असंगाशीं संग आणि प्राणाशीं गांठ-देवा रे देवा ! ( हुंदके देते.)

**कवीश्वर**—लग्नसोहळ्याचा रंग आणि प्रेमाची गांठ-देवारे देवा ! ( हुंदके देण्याचें मिष करतो.) लफ्फ्याचा जरतारी शालू अन् वरमाय म्हणून

वारूबाईची मिरवणूक—देवारे देवा! कवीश्वराच्या लग्नाचा प्रचंड थाटमाट —देवारे देवा! (हुंदके देतो.)

**वारूबाई**—उगीच कां रे माझी थट्टा करतोस तूं? माझ्या दुःखावर अशा चरचरीत डागण्या द्यायला तुला तुझ्या आईची कांहींच दया येत नाहीं ना? त्यांचं टोंचटोंचून बोलणं आणि तुझं बोंचबोंचून हिणवणं, मला आतां अगदीं सहन होत नाहीं. (रडते.)

**कवीश्वर**—आई-आई! ही सारी थट्टा का समजतेस तूं! नाहीं! नाहीं बरं-माझे लाडक्या आई. आपण बाहेर पडलों तें तुझ्या मनाजोगा माझा विवाह उरकून हेच तुझे दुःखाश्रु मी आनंदाश्रु करणार, नाहींतर नांवाचा कवीश्वरच नव्हे.

**वारूबाई**—आहारे माझ्या लाडक्या कवशा! खरंच, खरंच का रे हें सारं?

**कवीश्वर**—होय ग आई, आतां टाक पाहूं ते अश्रु पुसून. तुला किती वेळां सांगितलं बरं, कीं तूं आपल्या जिवाचा त्रागा करून उठल्याबसल्या अशी रडत जाऊं नको म्हणून. पहावी तेव्हां कावलेली-आणि साऱ्यांवर रागावलेली. अग, ज्यांचा राग नाकावर त्यांच्या सदा खांका वर—

**वारूबाई**—( जोरानें उसळून ) असूं देत रे! मागं इतका तुझा पाठिंबा आणि असा तुझा धीर असल्यावर आपला अपमान करणाऱ्या त्या भांडखोर रागिणीबाईचा सूड घेतल्याशिवाय मी राहीन-कीं काय? असल्या शिवराळ स्वागताबद्दल त्यांना माझ्या रागाचा तडाखा दाखविल्याशिवाय मला चैन पडेल कीं काय?

**कवीश्वर**—तर मग हा रडूबाईपणा सोडून बांध कंबर, आणि या पहा आल्याच कन्येसह रागिणीकाकू! [ **रागिणी** सक्रोध आणि **गौरी** प्रवेश करतात.] हो त्यांच्यांशीं भांडायला तयार. काकूला मुलीची मदत असली तर तुला मुलाची आहे! गौरीचं माझं लग्न झाल्यानंतर—

**गौरी**—हं! हं! अहो शेख महमद, मनोराज्यांतलंच लग्न हो!—

**कवीश्वर**—उपयोगी पडावं म्हणून निरनिराळ्या तऱ्हेचीं भांडणं कशीं भांडावीं त्याचं आयतंच आम्हांला सप्रयोग शिक्षण मिळेल!

**गौरी**—तें शिकवायला आहेतच दोघांच्या आया हजर.

**कवीश्वर**—आई ! तयार आहेस ना ?

**रागिणी**—वारुबाईंना भांडायचा इतका जोर असेल तर मीही तयार आहें. शिवराळ स्वागनाबद्दल मला रागाचा तडाखा दाखवणार ! राजापुरे भट, स्वभावानं खट, घातली पडशींत नारी, आले दुसऱ्याच्या दारीं; त्यांचं स्वागत असंच व्हायचं ! स्वतःचीं डबोलीं पुरून ठेवावीं आणि दुसऱ्याकडे मेजवान्या झोडाव्या ! बोलावलं होतं कुणीं इथं ?

**कवीश्वर**—गौरीचं लग्न होत नाहीं म्हणून रागोकाकांनींच नव्हतं का कळविलं आम्हांला ?

**गौरी**—म्हणून कांहीं माझ्याशीं लग्न लावायचं आमंत्रण दिलं नव्हतं तुम्हांला, बाबांनीं. कवि लंबे आणि मुखस्तंभे—

**कवीश्वर**—अरसिक वाचाळांच्या घोळक्यांत बिचाऱ्या कवीची तोंड दाबून बुक्क्यांचा मार अशीच अवस्था व्हायची !

**गौरी**—कल्पनासृष्टींत वाचाळ पण प्रत्यक्ष संसारांत दुर्लक्षामुळं तोंड बंद !

**कवीश्वर**—तें सैल सोडायचा वायकाच छंद घेऊन बसतात त्याला काय करायचं ?

**गौरी**—पाठीवर उताणे हात ठेवावे, डोकं चोळावं, पुढं नसलेल्या वस्तूकडे रोंख नजर लावावी आणि नायिका सांपडत नाहीं म्हणून लांब मुस्कारावं !—

**कवीश्वर**—लग्नासाटीं येऊनही वधूच नाकारूं लागली तर वरानं काय करावं !

**गौरी**—अशाशीं कोण लग्नाला तयार होईल ?

**कवीश्वर**—बाह्य भपक्यालाच सर्वस्व समजणाऱ्या नाहीं तयार होणार ! पण खडतर संसारालाही आपल्या गोड बोलांनीं ज्यांना रसाळपणा आणण्याची इच्छा असेल त्या कुमारिका होतील तयार. गौरी तयार नसेल तर गर्गशा. आतां इतक्यांतच सांगून आली होती मला.

**वारुबाई**—इश्श गो बाई ! येड्याचं बागडं आणि वडारणीचं तागडं ! आहारे ध्यान ! तिच्याकडे का तुझं लक्ष आहे !

**रागिणी**—गौरीसारखं सुंदर रत्न सोडून—

**कवीश्वर**—मग काय करावं बरं ? या साजेशा कोंदणाची तुमच्या या

रत्नाला पारख नाहीं. तुम्हीं कारागिरांनीं तें ह्या कोंदणांत बसवायला यायचं तर भांडखोरपणामुळं तुम्हांला वेळ नाहीं, आणि ह्या कोंदणाला रत्न तर पाहिजे; ही हिरकणी नाहीं तर तो नीलमणी !

**वारूबाई**—तो नीलमणी नको आणि ही हिरकणीही नको. आहाहारे, हिरकणी ! काय उजेड पडणार तें ठाऊक आहे मला. भांडखोर आईबापांची चवढाळ मुलगी; असली बोलभांड सून मी कधीं पत्करायची नाहीं.

**रागिणी**—आहारे तोंड ! चिकट तर चिकट आणि तोंडाचे तिखट ! अशा आईबापांचा असला हा गाजरपारखी आणि आंबटशोकी मुलगा मला तरी कुठं जांवई पाहिजे आहे म्हणा ! तरी पण तुम्ही गौरीला नाकारीतच असाल तर बरीक पांचहजार रुपये हुंडा देऊनही भाऊजींकडून तुम्हांला तिलाच सून पत्करायला लावतें कीं नाहीं तें मीच पाहीन.

**गौरी**—अग-अग, आई ! स्वागतासंबंधीं वारूकाकी काय म्हणाल्या त्याचीना चौकशी करायला आली होतीस तूं ?

**कवीश्वर**— गौरी ! आतां त्या विसरलेल्या गोष्टीवर उगीच भांडण उकरून काढण्यांत काय मौज आहे ? तुझं माझं लग्न होणार कीं नाहीं, ह्याच विषयावर नवीन भांडण काढूं आपण. ह्यांच्या नजरेखालीं शिकायचं आहेना आपल्याला ? मी म्हणतों तुझंमाझं लग्न होणार ! मी तुला आवडत नसलों तरी मी म्हणतों तुझं माझं लग्न होणार !

**गौरी**—न पटणाऱ्याशीं लग्नाला तयार होण्याइतकी मी वेडी नाहीं. तेव्हां मी म्हणतें तुमचं माझं लग्न नाहीं होणार !

**कवीश्वर**—नवऱ्याबद्दल भलत्याच कल्पना असणारी वेडीच आहेस तूं ! म्हणून तर म्हणतों तुझं माझं लग्न होणार !

**गौरी**—वेडीशीं लग्न करणारे आपण मोठे शहाणे ! म्हणून म्हणतें तुमचं माझं लग्न नाहीं होणार. लग्न मग, पण कवि म्हणून तुम्ही कसे आहांत हाच आपण वाद करूं. मी म्हणतें—

**वारूबाई**—करतां कीं नाहीं रे बंद ही तुमची बडबड ! यजमानीणबाई मुद्दाम माझा समाचार घ्यायला आल्या त्यांना बोलूं द्याल कीं नाहीं कांहीं ? टारगट कुठलीं ?

**रागिणी**—मी तुमच्या समाचाराला यायला मोठया बिबिजानच तुम्ही !

**कवीश्वर**—हां–हां गौरी, कवि म्हणून मी कसा आहें, तो वाद करायच तूं म्हणालीस नाहीं का ? कवि म्हणून मी म्हणतों मी मूर्ख आहें !

**गौरी**—हं ! कशाचे मूर्ख ! चांगले दुसऱ्यांना टोमणे मारतां तेव्हां कवि म्हणून तुम्ही मूर्ख नाहीं. हा माझा अदमास कधीं चुकायचा नाहीं !

**कवीश्वर**—ऐकलंतना काकू ! ही तुमची गौरी साऱ्यांच्या समक्ष काय कबूल करते आहे तें ?

**गौरी**—मी इथं असतांना आईला कशाला विचारायला हवं ? कवि म्हणून तुम्ही मूर्ख आहांत कीं नाहींत, हा खरोखरीचा प्रश्न नाहीं. ही केवळ आपल्या निरर्थक वादाची बाब आहे !

**रागिणी**—( उसळून ) चारगट पोरं कुठलीं !

**कवीश्वर**—हीं, चारगट पोरं कुठलीं ! गौरी, एवढी मोठी झालीस; तरी असलीं निष्फळ, निरर्थक भांडणं भांडायचीं म्हणजे निव्वळ मूर्खपणा—

**रागिणी**—शुद्ध गाढवपणा—

**कवीश्वर**—हेंसुद्धां तुला समजूं नये ? आईनं का आतां या गोष्टी तुला शिकवायच्या ?

**रागिणी**—हो, आतां लहान का आहे घोडी न समजायला ?

**वारूबाई**—काय समजतं त्याचा पडलाच आहे उजेड ! नुसता झकपक पोशाक केला म्हणजे कांहीं मनुष्य मोठं शहाणं होतं असं नाहीं !

**रागिणी**—शहाणं नसलं तरी श्रीमंत तर असतंना ? तेवढं तरी आहे का आपल्याजवळ ? त्या नेसूंच्या पोतेऱ्यावरून दिसतंच आहे काय असेल तें ! एखादं चांगलं लुगडं तरी भाउजींजवळ हट्ट धरून मागून घ्या, म्हणजे झाल्यातच विहीण तर निदान मला शोभण्यासारख्या तरी व्हाल !

**गौरी**—आई, काकूंच्या समाचाराला आली होतीसना ? तो घेतलास ! आतां चल पाहूं घरीं.

**कवीश्वर**—हाच का समाचार घ्यायला आलां होतां काकू ?

**वारूबाई**—( तुच्छतेनें रागिणीकडे पहात ) अरे, समाचाराला येणार ! खरं कारण सांगायला तोंड कुठं आहे ? अरे, समाचाराचं नुसतं निमित्त ! यांच्या या तोंडगमजा साऱ्या तुझ्यामाझ्याजवळ. इतके दिवस दादला मऊ सांपडला, घेतलं छळून त्याला भवानीनं ! आतां ते सासरोजी आले आहेत ना,

यांनीं चांगली खरवड काढली आणि दिली असेल घालवून ! असेल कशाला, गर्गशेनंच मला सांगितलं, कीं सासऱ्यामुळं बाईसाहेबांनीं घर सोडलं !

**रागिणी**—तर, तर ! ते कोण मला घालवून देणार ! आणि मोठे सासरोबा झाले तरी त्यांच्या घालवून देण्यानं मी बरी जाईन ? आणि ती मेली नष्ट गर्गशा, दिवसभर चोंबडचतराया करते, जाऊन तिचं नरडं ठेंचतें आणि सासरोबांनाच बाहेर काढते कीं नाहीं बघशील !

[ जाऊं लागते, समोरून **कर्कशराव** येतात.

**कर्कशराव**—चाललीस कुठें ? बंगल्यांत ? तिथें पाय तर ठेव, तंगडीच मोडून टाकीन तुझी. बेशरम बायका कुठल्या ! माजघराबाहेर ओटीवरसुद्धां बायकांचा आवाज येतां कामा नये आणि या भसाडतोंड्यांचा छळवाद दहा योजनें लांब ! यांनीं आपल्या लाजा बाजारांत विकल्या कीं काय ? घरींदारीं पहावा तिथें सांवळागोंधळ !

**रागिणी**—आली मेली इथंसुद्धां मागं यांची धिडका ! कानामागून आले आणि मारकुटे झाले ! जसा समंध लागला आहे मागं समंध !

**कर्कशराव**—जशी डाकीण लागली आहे डाकीण नवऱ्याच्या मागें ! नवरा मऊ सांपडला, कीं त्याची अरणी ठोकायला या घिसाडणी कधीं कमी करायच्या नाहींत ! त्याला घटकाभर तरी पोरीच्या लग्नासंबंधानें शांतपणें विचार करूं दे. खबरदार घरीं येशील तर !

**रागिणी**—इथं माझा, परक्यासमोर असा अपमान ! कां बरं ? घरीं यायचं कीं नाहीं तें माझं मी पाहून घेईन !

[ रागानें हातपाय आपटीत बंगलीच्या आंतील बाजूस निघून जाते.]

**गौरी**—आई, आई-( मागें जातां जातां ) आजोबा तर माझ्या लग्नाचं अगदीं कंकणच बांधून बसले आहेत ! इथं बहुधा गोष्ट काढतील; तर त्यांचा विचार आडून मला ऐकलाच पाहिजे. ( आड ऐकत उभी राहते.)

**कर्कशराव**—अस्सें हिला हद्दपारीचें काळेंपाणी दाखविल्याशिवाय, नाहीं ही चढेल बायको वठणीवर यायची !

**कवीश्वर**—अरे ! अरे ! इतक्या थरावर गोष्ट आली अं ? काकूंना किती वाईट वाटलं !

**कर्कशराव**—इतकें रडायला इथें कांहीं कुणाचें मर्तिक नाहीं झालें !

काम नसेल तेव्हां मुसळ आणि धुण्याची काठी, कोंपऱ्यांत उभीं असतात तसें बायकांनीं गुपचूप घरांत राहिलें पाहिजे. वाईट वाटण्याइतकी का ही सुधी बायको आहेसें तुला वाटतें ? ही रागाची फणफण आहे, तिला वाईट वाटेल त्या दिवशीं माझें कामच झालें. तिची पोरटी, कुठं गेली ती ? तिच्याशीं बागेंत एकान्तबिकान्त करतोस कीं नाहीं आतांशा ? गोरागोमटा आणि कपाळकरंटा ! येवढा एरंड वाढलास, तिच्यासारख्या तरुण पोरीशीं लग्नाआधीं एकीकडे हितगुज करायला लाज नाहीं वाटत तुला ? कॉलेजांत हेच का शिकलास ? निर्लज्ज !

**वारूबाई**—इश्श ! पुरुष तो, त्याला काय लाज वाटायची ? आपली नात मोठी मर्यादेची पुतळी ! तिला ठेवायची होती कोंडून !

**कर्कशराव**—हं, तोंड आटोप. बायको तर बायको; आणि चांभारचऱ्याया करते आहे माझ्यापुढें ! नातीला मी कोंडून ठेवीन, नाहींतर ह्या नाटक्याच्या ग॰ यांत बांधीन. निर्लज्ज भेटलीं आणि अंगाला खेटलीं-आतां थोडीच सुटका आहे याला तिचा घो झाल्यावांचून ?

**वारूबाई**—अशी काय मेली जबरदस्ती ती ? शहरची नटवी आणि ढालगज सटवी ! गर्गशा सांगत होती, कुणा तरी तरुण सोकाजीला ती वारंवार भेटत असते ! असली नको मला सून.

**कर्कशराव**—अग, हाच तुझा गुंड पोर असेल तो सोकाजी. काय रे ? त्या दिवशीं भ्रष्टाकार करून–आतां ऐकतो आहे कसा बेरडासारखा ! तूंसुद्धां गौरीला नाकारीत असलास तर म्हटलें, या आजोबांची नात आहे ती, चारचौघांत तुझा हात धरायला लावीन तिला ! तूं काय समजला आहेस ? दोघांच्या आईसबापसांनीं नाहीं म्हटलें तर ने तिला एखादे दिवशीं पळवून झालें. मी मागून येतों आणि देतों तुमचें शुभमंगल करून ! पाहूं दे राण्याचा नक्की विचार काय आहे तो. तास वाजे ठणाणा । राम कां रे म्हणाना ॥ तास वाजे ठणाणा—

[ म्हणत जातो.

**कवीश्वर**—( डुलत स्वगत ) तास वाजे ठणाणा...तोंड वाजे ठणाणा ...हे झोंड कोंकणे आजोबा तोंड वाजवतात खरं; पण ही अंतःकरणाच्या सात्त्विक संतापाची केवळ बाहेर पडणारी उकळी आहे. संसाराची टापटीप जराही चुकलेली यांना बिलकुल सहन होत नाहीं. तरीसुद्धां असल्या या

संतापांतही हृदयाचा प्रेमळपणा, अग्नीच्या प्रखर तापांतून प्रकाशाप्रमाणें सदैव वर डोकावल्याशिवाय रहात नाहीं. (पाहून) आई! तूं ग कां पुन्हा रडवें तोंड केलंस?

**वारूबाई**—जन्माची दळभद्री म्हणून! देवा! ह्यांच्यासारख्या त्रिक्कुमामांशीं गांठ घातलीस ती पदोपदीं माझी मानखंडणा करण्याकरितांच का रे? श्रीमंत म्हणायचं आणि नेसूंच्या लुगडयावरूनही लोकांनीं माझी लाज काढावीना? त्यापेक्षां मरण बरं! मला आपली भांडखेडयाला पोंचवून दे कशी!

**कवीश्वर**—म्हणजे शालूसाठीं बाबांजवळ तूं भांडण करणारच म्हणायची?

**वारूबाई**—शालू हवाच, शिवाय आजपासून कामाला हात म्हणून लावायची नाहीं!—गिळायला हवं असलं तर ठेवतील आचारी. घरकामाला दासदासी पाहिजेत. ताट मांडलं कीं पाटावर यायचं आणि अंथरुण पसरलं कीं निजायला जायचं!

**कवीश्वर**—आणि मग बाबांचं बोलणं ऐकून घ्यायचं! आई, क्रोधाच्या अग्नीजवळ पतीसारखा पुन्हा केव्हांही न मिळणारा अलंकार धुसफुशीच्या धुरानं खराब होतो, बिघडतो, हें कळत असूनही तुम्ही बायका संसाराचा स्वयंपाक तिथंच बसून केल्याशिवाय रहात नाहीं; याला काय म्हणावं?

**वारूबाई**—पण नवऱ्यानं तरी बायकोला असं नेहमीं धुसपुसायला कां रे लावावं? इतके दिवस गांवढळ म्हणून मला समजत नव्हतं; पण आतां झालें म्हणावं मी चांगली शहरढळ. रागिणीबाईचाही श्रीमंतीचा नक्षा चांगला उतरवलाच पाहिजे. तूंही कबूल केलं आहेस मला शालू द्यायचं!

**कवीश्वर**—तो आपला हट्ट तूं पुरवणारच! तर आतांच देतों बापडा आणून. जातों बरं का. तीं पहा, बाबा आणि काकू इकडेच आलीं; सावध रहा. प्राण गेला तरी गौरीला सून कबूल करूं नकोस. तिच्या संसारसुखाच्या कल्पना तुमच्यासारख्याच श्रीमंती डामडौलाच्या आणि शेलेशालूंच्या आहेत! एरवीं बरी आहे मुलगी पसंत पडण्यासारखी. काळे डोळे, निमगोरा रंग, भरदार ओंठ, कृशांग, तीक्ष्ण नजर, गति चपल, किंचित् लहरी—तोंडाची जरा जास्त वाचाळ आहे! पण आई, सदैव विचारांत गुंगणाऱ्या माझ्यासारख्या मनुष्याला कीं नाहीं असली भडभडीच बायको बरी. ती दुसऱ्याशीं शुष्क वादांत गुंतली

म्हणजे मला सरस लेखनाच्या नादांत निश्चिंत रहातां येईल. गौरीला कीं नाहीं वस्तूचं अंतर्याम पहायचं कुणीं शिकवलेंच नाहीं. तेव्हां चांगली अद्दल घडल्याशिवाय नाहीं तिचा सोकाजीचा शोक जाणार बरं ! तुझा शालूचा शोक—

**वारूबाई**—हो, जा लवकर. चांगला बुटीदार घेऊन ये अं ! ( कवीश्वर बाजूला गौरी आहे तेथून जातो ) आला म्हणजे नेसतें आणि—( माना डोलवीत डोलांत चालते.)

**कवीश्वर**—( एकीकडे-गौरीला पाहून ) अं ! इथंच होतीस का तूं ! चोरून ऐकण्याचाही गुण पैदा केला आहेस वाटतं !

**गौरी**—बरं, बरं ! तुम्हांला जर नाहींच माझ्याशीं लग्न लावायचं मग असेना का कोणताही गुण माझ्या अंगांत ! तुम्हांला काय करायचं आहे ?

**कवीश्वर**—रागावलीस वाटतं माझ्यावर ! हें पहा गौरी ! थट्टा नव्हे, संधि आलीच आहे तर खऱ्या खऱ्या भावानं माझ्याशीं लग्नाला तयार आहेस का ? म्हणून आणखी एकदां विचारतों तुला. हो, हल्लींचा हा प्रौढविवाहाचा म्हणजे दोघांनींही एकमेकांना पसंत करण्याचा काळ—

**गौरी**—होयना ! म्हणून तर माझा मीच पसंत करणार आहे; करतें आहें म्हणा पाहिजे तर.

**कवीश्वर**—नाहीं ! निवड करण्याइतकीं आपण म्हणजे मोठीं शहाणीं आहोंत असं नाहीं; पण दोघांनींही एकमेकांच्या अनुमतीनं एकमेकांना पसंत केलं असलं, म्हणजे त्यांतल्या त्यांत पुष्कळ बरं. यासाठींच तुला मी विचारतों आहें. तुझी अनुमति असेल तर हुंड्यापांड्याच्या आणि आपल्या वडील मंडळींचं एकमत होण्याच्या असल्या ज्या अडचणी आहेत त्या कशा दूर करतां येतील त्याचा आपण दोघांनीं मिळूनच विचार करूं. (~~तुझी अनुमति असल्यावर त्याचा आपण दोघांनीं मिळूनच विचार करूं.~~) तुझी अनुमति असल्यावर अडचणींची मला मोठीशी परवा वाटत नाहीं.

**गौरी**—आणि माझी अनुमति नसली तर !

**कवीश्वर**—तर मीही तुझ्याशीं लग्नाला तयार होणार नाहीं. पहा, विचार कर, प्रसंग आला—आणि तो आल्याशिवाय राहणार नाहीं-म्हणजे शेवटीं माझ्याकडेच यावं लागेल तुला.

**गौरी**—लागलांत का पुन्हा मला धाक घालायला ! तर मग-बघूं पुढं; आलाच तसा प्रसंग तर मग काय करायचं तें. जा; बोलूं नका माझ्याजवळ !

**कवीश्वर**—बरं बुवा. तुझ्याशीं आतां मलाच लग्न करायचं नाहीं जा.

[ सूचक नजरेनें पहात जातो.

**गौरी**—( जरा पुढें येऊन-स्वगत ) आजोबांच्या आग्रहावरून आणि आईच्या दुराग्रहावरून माझं लग्न कवीश्वरांशीं नक्की होणार कीं काय? किती वस्ताद आहेत पण! आजोबा जमदग्नीचा अवतार दाखवून बोलूं देत नाहींत. पण हे बोलण्याच्या डावपेंचांतच दुसऱ्याला निरुत्तर करतात! बाकी आई म्हणते तितके कांहीं चमत्कारिक नाहींत; अलीकडच्या पद्धतीप्रमाणें बायकोला देवता समजून तिच्याच सर्वस्वीं कह्यांत वागणारे असते तर किती बरं झालं असतं! छेः बाई, मला तर बाबांपेक्षांही, बायकोच्या अधिक कह्यांत वागणारा नवरा हवा! छेः! तें कांहीं नाहीं. आतां सोफाजीरावांची गांठ घेऊन लग्नाच्या दृष्टीनं पुढें पाऊल टाकलं पाहिजे.

[ जाते.

**चारूबाई**—अश्शी चालून दाखवितें रागिणीबाईंना! श्रीमंतीचा डौल कसा असतो तें. या म्हणावं पहायला! [ पुन्हा डौलांत बाजूला फिरते. इतक्यांत **बारोपंत** व **रागिणी** बोलत प्रवेश करतात ].

**बारोपंत**—तें सारं खरं! पण तुम्हीं कांहीं झालं तरी घर सोडायचं नव्हतं. तुम्ही निघून आलांत तर आजोबांना काय कळ लागणार आहे, आणि नवऱ्याचं तरी काय अडणार आहे म्हणा! एक बायको गेली तर दुसरी—

**रागिणी**—हो, तर! कांहीं झालं तरी मी बरी करूं देईन त्यांना दुसरी बायको! तोंवर काय मी झोंपा काढीत बसेन?

**बारोपंत**—अं! अहो वहिनी, पुरुष बायकांचा डोळा कधीं आणि कसा चुकवतील तुम्हांला ठाऊक नाहीं. त्यांचा कीं नाहीं, एक बोल, एक तोल, कधीं नसायचा. नेहमीं आपल्या स्वतःचा मोज एक आणि बायकोशीं माप दुसरं!

**चारूबाई**—खरंच तें. म्हणून मी आपली आजपासून—

**बारोपंत**—तूं थांबग जरा. समजलांत वहिनी! तुम्ही अगदीं ह्याच पावलीं परत जा आणि नवऱ्यापाशीं हट्ट धरून—

**चारूबाई**—तसंच करणार आहे, ऐकलं का! आजपासून मी—

**बारोपंत**—थांब ग, मधें मधें बोलूं नकोस, पांच हजार रुपये हुंडा द्यायला वहिनी तयार आहेत. आतांच आंत कबूल केलंत तुम्हीं, होयना! तर जा आणि नवऱ्याकडून म्हाताऱ्याला घराबाहेर काढवा. तो कोण एवढा मोठा!

**वारूबाई**—ऐकायचं कीं नाहीं माझं ! कांहीं झालं तरी माझा हट्ट मी पुरवून घेणारच ! साफ सांगतें, आजपासून मी—

**वारोपंत**—होय ग, वचावचा मधें बोलूं नकोस. मग घेईन तुझं ऐकून. वहिनी, मामंजी जरी घराबाहेर निघाले नाहींत तरी कवीश्वराशीं गौरीचं लग्न तुमच्या मनाप्रमाणं ठरवून तेवढा तरी हट्ट पुरवून घ्या. म्हणजे म्हाताऱ्याचा नक्षा उतरेल !

**वारूबाई**—तें नाहीं मी चालू द्यायची ! पांच हजार नाहीं दहा हजार रुपये हुंडा दिला तरी वाटेल तेव्हां दुसऱ्यांच्या भेटीगांठी घेणारी चवढाळ मुलगी मला सून नको. घरांत वळण गोंधळी आणि पोर झाली वेंधळी–लग्नाशिवाय ठेविली आहे मडम ! फिरायला काय जाते; कित्येक तरुण तिच्याकडे खेटे काय घालीत असतात ! साफ सांगतें, असली सून मला नको

**रागिणी**—तुम्हीं कबूल केलंत तरी भाऊजी, वारूबाई विरुद्ध आहेत ना ?

**वारोपंत**—असूं द्या हो, असल्या कामांत बायकांचं कोण ऐकतो ? घटकाभर फुणफुणेल आणि बसेल स्वस्थ.

[ वारूबाई मोठ्यानें हुंदके देत रहाते, तिच्याकडे वारोपंत त्रासिकतेनें आणि रागिणी समाधानानें पहात रहातात.]

**रागिणी**—कशी मिरची लागली नाकाला ? आतां पुन्हा म्हणाल का मला कधीं भांडखोर ?

**वारूबाई**—बरं, बरं. [ रडत पाय आपटीत निघून जाते.

**वारोपंत**—हं, आतां तुम्ही जा आणि लवकर कामाला लागा पाहूं. मामंजींचा नक्षा उतरला पाहिजे. हं, चला. थोड्या वेळानं लग्नाचं पक्कं करायला हा मी आलोंच तुमच्या मागें. [ रागिणी जाते.] पोर कशीही असली तरी माझ्या सपाट्यांत आल्यावर येईल ताळ्यावर ! तेवढ्यासाठीं–तुरुतचे पांच हजार रुपये आणि रागोपंत मेल्यानंतर मिळणारी पन्नास हजारांची इस्टेट, मी हातची जाऊं देतों कीं काय ? हिची समजूत ! ऊंः ! घालूं कशी तरी !

[ दुसऱ्या बाजूनें जातो.

---

## प्रवेश चवथा

[ **स्थळ**— बंगल्यापुढील बागेचा भाग. **रागिणी** येत आहे असें पाहून धांदलीनें **रागोपंत** प्रवेश करतो.]

**रागोपंत**—घटकाभर घरांत नव्हती तोंवर थोडी शांति मिळाली न मिळालीसं वाटतं तोंच आली परत ! तोंड बंद पडल्यावर तिला कुठलं चैन पडायला ? म्हणजे काय, ह्या संसाराच्या चक्रव्यूहांतून आमची सुटका नाहीं. वारोपंत आणि बाबा इथं येऊन बसल्यामुळें कुठं पळवाटच राहिली नाहीं. ही येते आहे तर आपणच जावं बाहेर निघून. [ **रागिणी** येते. तो न बोलतां जाऊं लागतो. ती त्याच्यापुढें होऊन अडविते. थोडा वेळ कुणींच न बोलतां दोघें एक-मेकांकडे पहात उभीं राहतात. रागिणी तोंडाला हात लावून मी बोलणार नाहीं अशी खूण करते.] काय, काय, काय ? तूं तोंड बंद केलंस ? बोलायचं नाहीं ? भांडायचं नाहीं म्हणतेस ? वा ! वा ! अशी जर गप्प झालीस—

**रागिणी**—हो, तोंडांतून अगदीं चकारशब्द काढायचा नाहीं असा मीं पक्का निश्चय केला आहे. तुम्हांलाच मी बोलायला नको तर माझं तरी काय अडलं आहे, बोलण्यावांचून ?

**रागोपंत**—शाबास ! अशी वागलीस, म्हणजे कुणालाच त्रास व्हायचा नाहीं—परत आलीस तर रागावूं नका, अशी बाबांचीही मीं मोठ्या शिकस्तीनं समजूत केली आहे.

**रागिणी**—बोलायचं नाहीं हा माझा निश्चय कायम टिकायला पाहिजे ना ? तर मग मामंजींना आतां जाऊं देना परत. नाहीं ? त्यांना काढून नाहीं लावायचं ? काय द्यायचं घ्यायचं असेल तें देऊन मोठ्या समारंभानं बोळवण करावी. देवानंच मेलं तोंड दिलं आहे बोलायला, पण न बोलावं तर मामंजी तोंड सोडतात आणि मग मलाही बोलण्याचा प्रसंग येतो.

**रागोपंत**—हं ! पुन्हा चाललीस आपल्या वळणावर अं !

**रागिणी**—मग काय हो ! मी एक मेली भांडखोर; पण ते सवाई भांडखोर आहेत त्याचं कांहींच नाहीं वाटतं ! त्यांनीं वाटेल तसं बोलावं, आणि मी बोलतें र माझं तेवढं तोंड दिसतं !

**रागोपंत**—बाबांविषयीं चकार शब्द काढूं नकोस. त्या दिवशीं त्यांनीं चांगली शोभा केली ती विसरलीस वाटतं? बोलावूं त्यांना?

**रागिणी**—कशाला? आतां इथंच भांडण जुंपायला! त्यापेक्षां त्यांची आनंदानं बोलवण कराना बरं!

**रागोपंत**—घरांतून बरी तुझी व्याद गेली होती, ती आलीस कशाला परत?

**रागिणी**—माझं घर म्हणून. माझ्या घरांत यायला माझी मी मालकीण आहें. मला कुणाची परवानगी नको. मामंजींचीच बोलवण झाली पाहिजे, आणि गौरीचं कवीश्वराशीं लग्नही झालं पाहिजे!

**रागोपंत**—म्हणजे? भांडणाशिवाय ज्यांना एकमेकांजवळ दुसरं कांहींएक बोलायचं नसतं असे एकाच घरांत राहणारे दोन प्राणी म्हणजे नवराबायको हीच तुझी भावना कायम. छेः, छेः! तूं सरळ ऐकायची नाहींस! बोलावतों बाबांना. [ **कर्कशराव** आणि **वारोपंत** येतात.

**कर्कशराव**—पेंढा, तूं तिचा नवरा आणि बाबा कशाला हवेत रे? बाबा का तुझ्या जन्माला पुरणार आहेत? बायकोवर काडीचा दाब नाहीं. बुळ्या कुठला! पोरीच्या लग्नाविषयीं कांहीं निश्चित ठरलें नसेलच तुझें! आणि तुझें ग चामुंडे? वारोपंत, मग सांग काय तें निश्चित.

**वारोपंत**—सांगितलंना? पांच हजार रुपये हुंडा कबूल असेल तर लग्नाला काय उशीर?

**रागोपंत**—अरे बाबा, नको असा हट्ट धरूं. कवडी म्हणशील तर माझ्याजवळ शिल्लक रहात नाहीं. माझ्या संसाराचे हे धिंडवडे तूं पहातच आहेसना?

**रागिणी**—कशाचे धिंडवडे? एकुलतीएक पोर, तिच्याकरितां पांच हजार म्हणजे कांहीं आपल्या ऐपतीबाहेर नाहींत. आयतं जुळतं आहे तर आतां कां मागं घ्यावं तुम्हीं?

**कर्कशराव**—गप्प बैस तूं. तें तोंड मधें मधें घालशील-( हात उगारतो; पण थांबवून) जास्त शोभा करून घेऊं नकोस. वारोपंत, तुम्ही दोघे बालपणचे मित्र, इतके दिवस आग्रह धरलास, पुष्कळ झालें. व्यवहारांत आपलाच हट्ट धरून बसणें चालत नाहीं आणि शोभतही नाहीं, आणि तें वाजवी नाहीं. दोघांनीं

त्वयार्धम् मयार्धम् करून एकदांचें मिटवा हें भांडण आणि करणीसुद्धां अडीच हजार रुपये हुंडा ठरवून निश्चित करून टाका हें लग्न.

**वारोपंत**—करणीसुद्धां अडीच हजार ! मी म्हणत होतों पांच हजार हुंडा आणि अडीच हजार करणी. रागोपंत, पहा बाबा; तुला गौरीच्या लग्नाचं संकट पडलेलं ऐकून मी मुद्दाम तुझी सोडवणूक करण्यासाठीं आलों. मुलगा चांगला शिकलासवरलेला, अगदीं तयार माल. त्याच्या शिक्षणाला खर्च झालेली रक्कम कवीश्वराच्या खात्याला जमाखर्चांत नांवें पडलेली दाखवतों. तेवढीसुद्धां त्याची किंमत नको ? तशांत गौरीसारखी–चवचाल पोर—

[ **गौरी** रागानें प्रवेश करते.

**गौरी**—(रागानें) काय, काय हो चवचालपणा केला मीं ?

**कर्कशराव**—( अंगावर जाऊन ) बेमुर्वत कारटे, वडिलांसमोर अशी अमर्यादा ! तुझीं वडील माणसें अजून मेलीं नाहींत; त्यांना आहे तुझी काळजी. खबरदार, एक अक्षर काढशील तर ?

**वारोपंत**—असली चढेल पोर सून पत्करायची ? छेः बुवा, व्यवहारांत आपण मित्रबित्र कांहीं जाणत नाहीं ! [ **कवीश्वर** येतो.

**कवीश्वर**—( प्रवेश करून ) बाबा–बाबा, काय बोलतां हें ?

**वारोपंत**—चूप ! पांच हजार रुपये देऊन रागोपंताला माझी मैत्री कायम ठेवायची नाहीं तर मलाच कशाला हवी त्याची परवा ! व्यवहार तो व्यवहार !

**कर्कशराव**—वारे, वारे, वारे ! काय पण मुक्ताफळें गळताहेत ! ह्या–ह्या–ह्या तुझ्या चळजिभेला कांहीं हाड तरी ! आमची मुलगी चवचाल आणि हा तुझा पोर ? काय पण मुलगा ? मोठा दाणा आणि त्याचा बापूस, तूं बेदाणा !

**वारोपंत**—काय पण मुलगी शहाणी ! आणि तिचा बापूस हा दीड शहाणा !

**रागोपंत**—होय बाबा; मुलीचा बाप ना मी ? हं ! जरुरीच्या वेळीं किती तरी जण आपले मित्र नसतात हें मला चांगलं समजावलंस तूं ! मूर्खानें मित्र म्हणून सूर्याच्या तोंडीं लागावें आणि ताप होऊन हिंवानें त्याला हुडहुडी भरावी अशीच केलीस माझी गत !

**गौरी**—एवढी कशाला हवी काकुळती बाबा ? माझ्यासाठींच एवढा हुंडा

देऊन त्यांच्यासारख्यांची भर करायचीना ? कांहीं नको, मलाच मुळीं लग्न करायचं नाहीं !

**कर्कशराव**—तें ठाऊक आहे हो मला, पोरी !

**कवीश्वर**—हुंडयामुळंचना ? माफ करा काका. बाबा कांहीं बोलले तरी तें रागाच्या भरांत; तेवढ्यापुरतंच—

**वारोपंत**—बापावर पोराची सखलाशी ! चल, हो बाजूला ! खबरदार, तोंडांतून एक अक्षर काढशील तर. पांच हजार हुंडा आणि अडीच हजार करणी.

**रागिणी**—हो, एकुलती एक मुलगी; थोडा खर्च अधिक झाला तरी कवीश्वराशींच तिचं लग्न झालं पाहिजे !

**गौरी**—मला मुळींच कबूल नाहीं ती गोष्ट. एकदां सांगितलं नाहीं म्हणून. पुन्हा बजावून सांगतें. मी आपली जातेंच कशी निघून ! [ जाते.

**कवीश्वर**—बाबा, संबंध जोडायचे प्रेमासाठीं. हुंड्यावरच नडलं असलं तर कांहीं कमीजास्ती करा; पण सलोखा कायम राखा.

**कर्कशराव**—इतकें रडूबाई कशाला ? काय वारोपंत, नाहींच ऐकत तूं माझें ?

**वारोपंत**—पांच हजार हुंडा, अडीच हजार करणी !

**रागिणी**—आणि गौरीचं कवीश्वराशीं लग्न !

**कर्कशराव**—अरे कुकरमुंड्या, मुलाचा बाप म्हणून दिमाख दाखवतोस होय ? तुझ्यासारखे अकरा गेले; बारावा पुजीन तुझा, तूं काय समजला आहेस !

**वारोपंत**—हं ! बेअब्रूचे शब्द उच्चारून अशी धमकीबिमकी देऊं नका. सद्गृहस्थ मी ! धमकीची फिर्याद करून अब्रूनुकसानीबद्दल दहा हजार रुपये ठोकून घेईन ! लक्षांत ठेवा !

**कवीश्वर**—बाबा-बाबा—

**कर्कशराव**—कुणाला-कुणाला-रे दाखवतोस सद्गृहस्थाची मिजास ! तूं सद्गृहस्थ, आणि आम्ही कोण हजाम आहोंत होय ? अरे जा रे दीडदमडीच्या ! दहा हजार रुपये मागतोय ? चल तूं राग्या. यांच्या पोरासारखे कित्येक सोकाजी येतील मागणी घालायला ! चल. [ जातो.

**रागोपंत**— हो; एवढी कशाला हवी तुझी परवा ! जा, जा. [ जातो.

**रागिणी**—हां—हां—हां ! हें काय ? मुलीचे वडील आपण, आपल्याला कसं इतकं बेपरवा होऊन चालेल ! गेलेच निघून—तें कांहीं नाहीं. गौरीचं कवीश्वरा पाशींच लग्न झालं पाहिजे. हट्टच धरून बसतें मुळीं. [ जाते.

**वारोपंत**—मुलीकडचीं तर मुलीकडचीं आणि इतका वरचढपणा ! मीच पहातों कोण पत्करतो असल्या पोरीला तें ! साऱ्या जगभर डांगोरा पिटतों तिचा आणि मग पहातों बापूस आणि आजला कसे नाक घांशीत येत नाहींत तें ! जातात कुठं ! शिवाय जाण्यायेण्याच्या खर्चाबद्दल दुसऱ्या वर्गाच्या भाड्याची देतों फिर्याद ठोकून कोर्टांत ! जातात कुठं ? आलेच पाहिजेत पायां पडत. मग पांच हजार हुंडा आणि पांच हजार करणी. [ जातो

**कवीश्वर**—बाबा—बाबा. अयायायायाई ! आतां शांत तरी कुणा—कुणाला आणि कसा कसा करूं ! [ जातो. पडदा पडतो.

## अंक दुसरा समाप्त

# अंक तिसरा

## प्रवेश पहिला

[ **स्थळ**—बंगलींतील ओसरी. **रागिणी** रागानें प्रवेश करते.]

**रागिणी**—कितीही हट्ट धरा कीं कांहीं करा. थेरडा घरांत घुसला आहे तो चालूं देईल तर ना! त्यानं तिकड तर अगदीं पछाडल्यासारखं केलं आहे! त्यांना या ब्रह्मसमंधापासून सोडवायला आतां मांत्रिक तरी कोण आणूं मी? भाऊजी, अहो भाऊजी! [**वारोपंत** येतो.

**वारोपंत**—( प्रवेश करून ) काय, काय वहिनी? बहुतकरून तिकडे कांहीं दाद लागली नसेलच! काय झालं?

**रागिणी**—काय सांगूं तुम्हांला माझं कपाळ! कसला—कसला म्हणून इलाज चालूं देत नाहींत हो मामंजी! त्यांचं मन वळवायचं; पण संधि मिळूं देईल तर ना थेरडा! सावलीसारखा मागं लागला आहे बघा. बोलणं काढावं तोंच कसा चट्कन् आकाशांतून कोसळल्यासारखा मधें येऊन पडतो. मग तिकड-च्या अंगांत भरतं पितृभक्तीचं वारं आणि मला बसावं लागतं गप्प! सांगा हो भाऊजी, आतां करूं तरी काय मी!

**वारोपंत**—( विचार करीत ) मीसुद्धां ह्याच गोष्टीचा सारखा विचार करतों आहें. वहिनी! उपाय—आहे—

**रागिणी**—( सोत्सुक ) काय—काय भाऊजी, उपाय आहे म्हणतां?

**वारोपंत**—हो, आहे तर!

**रागिणी**—गौरीचं लग्न व्हायचं तें होईलच; पण आधीं या थेरड्यानं मला नाक घांसायला लावलं त्याचा चांगला नक्षा उतरेल असा कांहींतरी उपाय सांगा हो!

**वारोपंत**—हो, मनांत असलं म्हणजे उपाय नाहीं कशाला, वहिनी! एक अगदीं रामबाण उपाय आहे! पण—तुम्ही कराल तर—

**रागिणी**—कोणता? सांगा, सांगा पाहूं कोणता उपाय तो!

**वारोपंत**—म्हातारा तुम्हांला घरांत राहूं देत नाहीं, नव्हे ? त्याकरितां अन्नवस्त्राच्या खर्चासह रहायला स्वतंत्र घर मिळावं अशी नोटीस देऊन टाकावी.

**रागिणी**—नोटीस ? पण—पण—काय हो भाऊजी, नोटीस द्यायची ती मामंजींनाच ना ?

**वारोपंत**—मामंजींना तर द्यायचीच; पण मुख्यतः ती रागोपंतालाच दिली पाहिजे ! अहो, त्यांत काय मोठंसं आहे ? नोटीस द्यायचीच ती त्यांना काय आणि ह्यांना काय ! एकच !

**रागिणी**—तर मग ती तुम्हीच द्या मला लिहून !

**वारोपंत**—मी ! मी कशाला ? तुमचं आपसांतलं भांडण, तें तुमचं तुम्हीच पाहून घ्या.

**रागिणी**—वा ! हें हो काय भाऊजी ? तुमची मदत असल्याशिवाय मी बाईमनुष्य एकटी काय करणार ? आणि दुसरं कोण मला नोटीस लिहून देणार ? ते देतील ?

**वारोपंत**—वाः ! ते कसे देतील ? अहो, त्यांनाच नोटीस द्यायची ना !

**रागिणी**—तर मग तुम्हींच दिली पाहिजे !

**वारोपंत**—बरं; तुमचं म्हणणंच आहे तर देतों मी लिहून !

**रागिणी**—जाऊं तर मी ? निश्चित राहूंना ! होईल तितकी लवकरच लिहून आणा हो. [ जाते.

**वारोपंत**—ठीक आहे. अशा रीतीनं घरांतलीं भांडणं यांचीं यांच्याकडून चव्हाट्यावर येऊं लागलीं, म्हणजे ती थांबविण्याकरितां तरी येईल रागोपंत ताळ्यावर ! कसं तरी करून त्यांच्याशीं मला जुळवायचंच आहे म्हणून; नाहीं तर मीं सुद्धां आतांपर्यंत दिलं असतं दोन तीन फिर्यादीचं त्याच्या मागं शुक्लकाष्ठ लावून ! तितकीच वेळ आली तर त्यालाही मागं घेणार नाहीं म्हणा ! ठीक. नोटिशीपासून आरंभ तर करून ठेवावा. [ जातो. पडदा पडतो.

## प्रवेश दुसरा

[ **स्थळ**—बाग-एकांतभाग. **गौरी** प्रवेश करते. ]

**गौरी**—( स्वगत ) त्या दिवशीं साऱ्या मंडळीसमोर कवीश्वराशीं मल

लग्नच करायचं नाहीं म्हणून प्रौढीनं बोललें आणि आज सोकाजीरावांना मोठ्या उत्कंठेनं भेटायला आलें; पण येतां येतां विचारांबरोबर ती उत्कंठा तरी आतां कायम कुठं राहिली आहे ? कवीश्वर आणि सोकाजीराव—एकाच वेळीं समोर असल्यामुळं जन्माचा सोबती निवडणं ही गोष्ट मला वाटे तेवढी सोपी नाहीं हें आतां मल पटूं लागलं आहे. हे दोघेही आपापल्यापरी बरेच वाटतात. कवीश्वरांची ती हुकमी नजर जेव्हां जेव्हां माझ्या नजरेला भिडते, तेव्हां तेव्हां किंचित् भय वाटतं, हृदय कंप पावतं आणि माझीच नजर खालीं जाते खरी; पण पुनः पुन्हा चोरून त्यांच्याकडे पहावं असं मनाला वाटतं! खट्याळ मांजरी धन्याच्या हुकमी नजरेपुढं जशी चट्कन् दबते तसं मला तेवढ्या वेळेपुरतं त्यांच्या इच्छेप्रमाणं वागावंसं वाटतं ! एखादी वेडीवांकडी गोष्ट दिसली तर त्यांची ती नजर मुकी, तरी पण ती 'असं कां !' असं विचारीत आहेसा भास होतो. तसाच त्यांच्या बोलण्याचालण्यांत, करण्यासवरण्यांत साऱ्या बाबतींत कसा हुकमी बाणा दिसून येतो. ही त्यांची हुकमत मला आवडत नाहीं; पण अयोग्य कांहीं वाटत नाहीं खास. शिवाय त्यांची ती सर्वांगीण मार्मिकता, हुकमी बाणा, दुसऱ्याची विनोदानं समजूत करायची ती लकब—सारं—सारं कसं चांगलं आहे. तरी पण दुसरे हे सोकाजीराव—माझ्याशिवाय दुसरं तिसरं यांना कांहीं दिसतच नाहीं ! काय ती एक मीच, माझ्यासाठीं ते काय वाटेल ते करतील, असं पहाणारी त्यांची नजर—[ **सोकाजीराव** रुमालांत माळ व गजरा घेऊन येतो. एकमेकांकडे पाहतात व ती उठून सलज्ज बाजूला होते.]

**सोकाजीराव**—छेः, छेः ! पायाला असे श्रम देण्याचं कांहीं कारण नाहीं आणि काय ग, आम्हां पुरुषांमध्यें असं काय आहे, कीं भेटीला आलेल्या तरुणाला पाहिल्याबरोबर तुम्हीं कुमारिकांनीं एकदम असं गांगरून जावं ! मग बावरावं, नजर चंचल व्हावी आणि गालांवर लाज गुलाबी खेळ खेळूं लागावी ! पण तुम्हांत खुमारी आहे ती हीच, अहाहा ! हें तुझं चित्र—रहा, रहा; अशीच उभी रहा आणि मला तें डोळे भरून—हृदय भरून—पाहूं दे ( थोडा वेळ पाहून ) छेः ! आतां गेली ती खुमास आणि मुद्रा विचारी दिसूं लागली ! लाडके, कसला आला विचार मनांत ? असून सुद्धां तूं कांहीं माझ्याशीं पुरीपुरी मन मोकळी वागत नाहींस, बोलत नाहींस !

**गौरी**—( लांब होऊन—स्वगत ) काय बोलूं ? काय सांगूं ? कवीश्वरांचेही

विचार मनांत येतात म्हणून कळवूं का लग्नाची गोष्ट सूचित करूं ? आजोबांमुळं लग्नाचं मागं निकडीचं टुमणं नसतं तर भेटीगांठी होतां होतां सलगी वाढली असती आणि बोलण्याचालण्यांत सहजगत्या लग्नाच्याही गोष्टी निघाल्या असत्या. आणि—

**सोकाजीराव**—हं, आलं आहे मनांत ! बोल, बोल. हें काय बरं ! बोलायला यायचं आणि अबोला धरून बसायचं. मी आपला जातोंच... जीव द्यायलाच जातों कसा ! ( जाण्याचा आविर्भाव करून ) गुप्त भेट म्हणून आधींच थोडा वेळ मिळायचा—

**गौरी**—हो, हो; खरंच. बायकांचा जन्म. आपल्यांतल्या लग्नाच्या चालीरीति आणि जन्माच्या सोबत्याची निवड—हेच विचार मनांत चालले आहेत, दुसरं काय ! भारीच ताण बसतो मनाला हो. सध्यांही ते एक चिकटे येऊन बसलेच आहेत आणि आजवर तर तऱ्हेतऱ्हेचे कितीएक येऊन गेले. तासटकले आणि संजाबे, ढोंपरघोळपंचाळे आणि पायघोळधोतरे, रुमालछंद आणि पगडबंद; बूटवाले, जोडेवाले, पायतणवाले, काठीवाले—अनेक भोळे, गोळे, गोरे, काळे, खरे, खोटे, करोडी, पै, टिल्लू, तट्टू, ढब्बू, गब्बू—सारे एकत्र जमवले तर एक मोठं मौजेचं प्राणिसंग्रहालय होईल !

**सोकाजीराव**—जा गडे. मला तर तुझ्याशिवाय दुसरं कांहीं सुचत नाहीं, आणि तुला असला विनोद सुचतो ! ह्या सोकाजीरावाचा तुझ्यासाठीं प्राण चालला आहे, मग निवडीचा ताण बसायचं काय कारण बरं ! माझा जीव अर्धा झालाच आहे, तो सगळा जाईपर्यंत का तूं माझा अंत पाहणार ! तो चिकट्या आला आहे, त्यामुळं का मनाची चलबिचल होते तुझ्या ?

**गौरी**—हो—नाहीं, नाहीं. तसंच नाहीं केवळ—

**सोकाजीराव**—( निराशेनें कपाळावर हात मारून ) हाय, हाय ! माझंच नशीब खडतर ! मीच दुर्दैवी, अभागी ! देवा ! देवा ! माझ्या अंतरात्म्याची तळमळ हिला बाहेर दाखवितां आली असती—माझं पिळवटणारं हृदय काढून हिच्या हातावर ठेवतां आलं असतं ! हृदया ? फूट; ताड्कन् फुटून माझ्या लाडकीच्या पायांपुढं पायघडीसारखं पसर ! ( गुडघा टेंकून छाती पुढें करून ) ये, ये, प्राणवल्लभे, एक तर या हृदयाला आदराच्या हातांनीं सांवरून धर, किंवा

अनादराच्या लाथांनीं तुडवून, चिंधडून त्याला इथेंच मातींत पुरून टाक! नामशेष करून टाक! [ डोकें टेंकतो.

**गौरी**—काय माझ्यासाठीं यांची अवस्था ही! आणि कवीश्वर म्हणतात हे बदमाष आहेत. छेः, छेः! ही ह्यांची बेहोष वृत्ति पाहिली म्हणजे माझेही सारे विचार लोपून जातात आणि वाटतें—( हात पसरून उठवायला म्हणून पुढें होऊन पुन्हा मागे होते. )

**सोकाजीराव**—दुर्दैव्या—हतभाग्या—सोकाजी, माझ्या लाडकीची केव्हां एकदां माझ्या राजवाड्यांत देवीप्रमाणे स्थापना करीन, केव्हां एकदां अलोट अलंकारांनीं तिची मनोवेधक पूजा बांधीन, हार-तुऱ्या-गजऱ्यांनीं केव्हां एकदां तिला सजवीन, गाडी-मोटारींतून केव्हां एकदां तिची मिरवणूक काढीन! सोकाजी, सोकाजी, अशा सुखस्वप्नांत कशाला गुंगतोस रे! गौरीसारखं रत्न तुझ्या भाग्यांत नसतांना कशाला त्याची हांव धरतोस रे! पण काय करूं? गौरी, तुझ्याशिवाय मी जगणंच शक्य नाहीं! तुझ्या कृपेचा मनोहर स्वर्ग किंवा मृत्यूच्या साम्राज्याचा भयाण मार्ग-तो—तो—मृत्यूचा भयाण—भयाण—गुडुप अंधाराचा मार्ग— [ झांप आल्याप्रमाणें पडतो.

**गौरी**—( वळून व मस्तकावर हात फिरवून ) हां, हां, सोकाजीराव. सोकाजीराव, उठा गडे! सावध व्हा—सावध व्हा. आतां काय करावं? यांना तर मूर्च्छा आल्यासारखी दिसते! ( रुमालानें वारा घालून ) सोकाजीराव—सोकाजीराव, उठा, सावध व्हा. छेः! पाणी—पाण्यानें रुमाल तरी भिजवून आणिते. [ घाईनें जाते.

**सोकाजीराव**—आतांच ही बेसावध सांपडेल. ह्याच वेळीं पुरी लगट करून सोकाजीच्या खऱ्या अंतःकरणाचा हिला मासला दाखविला पाहिजे. अविचारी आणि बहकलेली म्हणून वाटली होती, तितकी बेटी बेसावध होत नाहीं. आतां पाहूं. (गौरी भिजवलेला रुमाल घेऊन येते आणि मस्तकावर व डोळ्यांवर फिरविते.)

**गौरी**—सावध व्हा, सावध व्हा सोकाजीराव.

**सोकाजीराव**—(सावध होऊन किंचित् डोळे उघडून) अहाहा! गौरीच्या करस्पर्शाचं अमृत—तसंच गौरी, तुझ्या त्या गोड शब्दामृताचं औषधही कानांत घाल. ( तिचा हात हातांत धरून ) अहाहा! ( ती हात मागें ओढते. तो न सोडतांच त्याच्या टेक्यानेंच उठून उभा राहून ) आतां झालों मी चांगला सावध

आणि हत्तीचं बळ चढलं आहे मला ! अहाहा ! माझी गौरी ! ( हातावर हात चोळीत ) माझी लाडकी गौरी !

**गौरी**—सोडा गडे माझा हात, असं काय बरं !

**सोकाजीराव**--( न सोडतांच ) गौरी, लाडके, एकदां तुझा हात धरला तो सोडण्याकरितां का ग ! आतां तो सदैव असाच मी माझ्या हातांत ठेवणार. वाटतं, लग्नासारख्या विलंब करणाऱ्या गोष्टीसुद्धां नकोत. चल, अशींच आपण जाऊं आणि जगाच्या पाठीवर प्रवास करीत एकमेकांच्या सहवासांत मौजेनं दिवस घालवूं. चल--

**गौरी**—( ~~हात हिसडून पण त्याला सांभाळून~~ ) असं नाहीं करायचं आणि असं भलभलतं बोलायचंही नाहीं गडे. मला नाहीं हो तें पसंत पडायचं ! कितीही प्रेम असलं तरी रीतसरच साऱ्या गोष्टी झाल्या पाहिजेत.

**सोकाजीराव**—मीच वेडा—प्रेमानं तूं पण माझ्यासारखी कशी बेहोष होत नाहींस ? होतेस—गुंगतेस—पण तेवढ्यापुरतीच. बरं बुवा; तुझा तसाच आग्रह असेल तर मी तावडतोब मागणीच घालायला येतों तुझ्या वडिलांकडे. मागणी घालून, लग्न होऊन—अबबब ! तोंवर जीव धरून कसा राहीन तो राहो. पण काय करायचं ! जगणं जरूरच आहे मला !

**गौरी**—हें ठीक बोललांत. मनाला पुष्कळ वाटलं तरी लौकिक कुणाला सुटला आहे का ? उपजत बुद्धि कांहीं एका विशिष्ट मर्यादेपलीकडे जाऊं देत नाहीं आम्हांला; हें विसरूं नका अं !

**सोकाजीराव**—खऱ्या प्रेमांत–प्रेमाच्या अलोट प्रवाहांत लौकिकाच्या आणि उपजतबुद्धीच्या खडकांनीं असं ठायीं ठायीं अडवावं ? मी तर म्हणतों, एकमेकांच्या गळ्यांत मिठया मारून आपण दोघंही त्यांत वहावत गेलों, बुडालों, गडप झालों—तें सुख—तो बेहोषपणा—लाडके, येतांना बरोबर मीं सुंदर फुलांचा गजरा आणला आहे, तो तुझ्या अंबाड्यांत माझ्या हातानं घालण्याची माझी हौस तरी मला पुरवून घेऊं दे. बैस, अशी कोचावर आणि हा पहा गजरा, मी बांधतों, बरं का. ( गुंग बसते. तो पाठीमागें जाऊन गजरा बांधतो आणि प्रथम त्याचें नंतर मस्तकाचें हळूच चुंबन घेतो. नंतर डोक्यावर दोन्ही बाजूंनीं हात खालीं

आणून हनुवटी खालीं नेतो व हनुवटी उचलून चेहरा वर करून चुंबनासाठीं तोंड पुढें करतो.)

**गौरी**—( अकस्मात् भानावर येऊन व उसळीनें उठून पाठमोरी त्याचेकडे वळून सक्रोध ) हें काय हें ? असं अंगचटीला येणं बरं नाहीं. मला आवडणार नाहीं म्हणून आतांच सांगितलंना तुम्हांला ? वा रे वा ! मी निघूनच जातें कशी ! ( जाऊं लागते.)

**सोकाजीराव**—( झट्कन् तिच्यापुढें होऊन ) रागावूं नको गडे, प्रेमाच्या तडाक्यानं मी बेहोष झालों, भानच राहिलं नाहीं मला.

**गौरी**—प्रेम असं हातघाईवर—छेः ! विकाराचीच उचल ही. आतां इथं राहणं ठीक नाहीं. व्हा बाजूला. जाऊं द्या मला.

**सोकाजी**—लाडके, लाडके, निदान तुझ्या हाताचं तरी चुंबन घेऊं दे मला. मी जिवंत राहायला पाहिजे असेन तर तेवढं तरी मला नाकारूं नको !

**गौरी**—हा काय बाई लोंचटपणा तरी. जाऊं द्या मला. ( जाऊं पहाते, तो पुन्हा अडवतो. ती तिरस्कारानें पहात ) अगदींच ताळ सोडलात तुम्हीं अं ! अशानं माझा विश्वास कमी होईल ! तें कांहीं नाहीं. जाऊंद्या मला.

**सोकाजी**—( तिला जाऊं न देतां ) छेः ! एवढी गोष्ट तरी मिळवल्याशिवाय मी राहणारच नाहीं ! ( तो हात मनगट कांहीं वेळ कुरवाळतो आणि पाठपंजाला कडकडून दांत उठतील असा चावतो.)

**गौरी**—( विव्हळून ) आयायायाई ! हें काय हें—निर्लज्ज ! ( हात हिसकून व ओढून तिरस्कार आणि रागानें त्याच्याकडे पहात झट्कन् निघून जाते.)

**सोकाजी**—हें ठीक झालं. हिच्या मनाची कवीश्वर कीं सोकाजी, अशी चलबिचल होण्याची पायरी ह्या प्रवेशापूर्वीं मीं गांठलीच होती. आतां त्या मनोभावनेंत सोकाजीच्या लगट करण्याच्या अधिकपणाबद्दल तिरस्कार आणि राग यांची भर पडली. त्यांतच मनाशीं योजून ठेविलेल्या ह्या पत्रांतील मजकुराची भर पडली कीं गौरीला सोकाजीचं अंतरंग पुरंपुरं कळून येईल ! तिच्या हातीं हें पत्र पडेल अशी काय बरं युक्ति करावी ! ( ऐकून ) कुणी तरी आलं वाटतं ! [ **वक्रतुंड** येतो.] अरे, हा वक्रतुंड ! ह्याच्याबरोबर आईकरितां शालू पाठविला होता तो देऊन स्वारी परत चालली आहे वाटतं.

पत्र पोंचवायला योग्य असं बरं अगदीं वेळेवर पात्र आलं! (खिशांतून पांचसहा पत्रें काढून पहाण्याचें मिष करतो.)

**वक्रतुंड**—कवीश्वरांनीं वारूबाईना देण्याकरितां मजबरोबर सुवर्णवस्त्र पाठविलं तें त्यांचं त्यांना दान करून असलं महावस्त्र परिधावन केल्यावांचून सासू म्हणून गौरीच्या मनांत त्यांची स्थापना होणार नाहीं असं त्यांच्यापाशीं व्याख्यानही केलं. आतां गर्गशा-( सोकाजीस पाहून ) कः ? कोण तो ? कः ? कोण तुम्ही ? कुत आयातः ? कुणी सोकाजी ताईसाहेबांशीं प्रेमाचं गुप्त व्याख्यान करण्याकरतां चौरकर्मानें येत असल्याचं परिशीलन केलं आहे तोंच हा सोकाजी. दुष्टा ! अशी अमानुष रचना करून ताईसाहेबांचं अवधान ओढतोस काय ? ( जलदीनें पुढें जातो, तोंच ठरविलेलें पत्र पडल्याचें मिष करून सोकाजी पळून जातो. तें पत्र वक्रतुंड उचलून घेतो.) हा दोघांच्या गुह्य प्रेमाचा ग्रंथ असावा ! त्याचं पठण करून स्फोट केलाच पाहिजे. ( उघडून वाचतो ) अं ! हा तर लग्नग्रंथी मारलेला गृहस्थ दृश्यमान होतो. कुणा तरी सौभाग्यवतीशीं लग्नग्रंथी बद्ध झालेला हा सोकाजी प्रचंड पापी परिस्फुटित होतो. याला एक सौभाग्यवती असून दुसरं दांपत्य जोडूं पाहतो. हयाची ताईसाहेबांजवळ विचक्षणा करतों, म्हणजे त्या ह्या पापी पुरुषाला बहिष्कृत करून कवीश्वराशींच आपलं लग्नाचं कारस्थान करतील आणि मग गर्गशा माझा स्वाहाकार करा म्हणून निश्चयानं माझ्या चरणीं पतन पावेल !

[ जाऊं लागतो. समोरून **गर्गशा** येते. ती वक्रतुंडाशीं न बोलतांच नाक मुरडून जाऊं लागते.]

ए, ए गजगामिनी, माझ्या दर्शनानं नाकाचं उड्डाण झालं, डोळे महत्त्व पावले— अशी तप्त का ? पलायन करूं नको ! मी अस्पर्श नाहीं !

**गर्गशा**—नाहीं तर काय ? वक्रतुंड ते वक्रतुंडच. कवीश्वरांच्या नखाची तरी सर आहे का तुम्हांला ?

**वक्रतुंड**—बरं ! बरं ! तुझा दर्प फार प्रबळ झाला आहे, त्यामुळं जणुं काय तूं स्वर्गस्थ झाली आहेस. थांब, आतां लवकरच तुला अधःपातखंडित करतों. हें पाहिलंस, त्या सोकाजीचं गुह्य मला विख्यात झालं आहे ! दर्शन कर !

**गर्गशा**—( जवळ येऊन ) काय, काय आहे, पाहूं द्या मला !

**वक्रतुंड**—हां, हां, लंबायमान हो, लंबायमान हो! आतां कां जवळ येतेस? मी अस्पर्श आहें.

**गर्गशा**—असं काय करतां! सांगाना मला काय तें.

**वक्रतुंड**—माझ्याशीं आपलं लग्नघटीयंत्र स्थिर करायची प्रतिज्ञा करीत असशील तरच वेदना करीन! नाहीं तर तोंड कृष्ण कर!

**गर्गशा**—नसलं सांगायचं तर ही चाललें मी. ठाऊक आहे मला काय आहे तें! सोकाजीराव गौरीला भेटत असतात हीच गोष्ट ना?

**वक्रतुंड**—ऊंः! त्या कथेचं कीर्तन जगभर झालं आहे. परपुरुषसंचार करायला पाहिजे नाहीं का तुला? कर आतां कवीश्वराचा त्याग आणि मुक्त हो! नाहीं तर लवकरच तुला माझ्या मागं मागं पलायन करायला लावतों, आणि मग. पाहतों मला स्त्रैण करायला तत्पर होतेस कीं नाहीं! मग आपल्या लग्नाचं क्रिया-कर्मांतर लवकरच उरकून, घेतों तुझा विवाह-होमांत बळी आणि टाकतों तुला एकदम स्वाहा करून!

**गर्गशा**—ठाऊक आहे आपला पराक्रम मला! कवीश्वर तुमच्यापेक्षां जास्त शहाणे आहेत. ते मला अनुकूल असेतों तुमच्या गमजा नकोत. पुरे झाली ही बडबड! जा— [ जाते.

**वक्रतुंड**—आहाहा! तप्त झाली म्हणजे काय मादक होते आणि काय नयनविलास फेंकते ही! सोळा संवत्सर म्हणजे ही गर्गशेच्या तारुण्याची संक्रांत आहे! शरीरावर अवयवांचा उत्पात होतो आहे! कटिलालित्य वर्धमान होत आहे. आहाहा! ही मला कशी पण सुशोभित होईल! कसंही करून तिचा संग्रह मला केलाच पाहिजे. माझ्याशीं संघटित व्हायला अजून तत्पर होत नाहीं! ह्या पत्रानं कवीश्वर हिच्या हृदयांतून अंतर्धान पावला कीं मग तर दुसरा नवरा हिला कर्तव्य होईल कीं नाहीं? आजोबांचा अवतार झाल्यापासून यजमानांचं सेवन फार त्रस्त होऊं लागलं आहे. स्वतंत्र चहा भोग-भांडार उद्‌धृत करतों आणि मग मानिनी गर्गशे, तुझी मानहानि करून हल्लीं तूं आचारी आहेस, ती तुला अनाचारी करीन आणि एकदांची माझ्या चहा-भोग-भांडारांत पण्यांगना नवीन तरच नांवाचा वक्रतुंड!

[ मिशा पिळीत जातो. पडदा पडतो.

---

## प्रवेश तिसरा

[ **स्थळ**—बंगलीजवळील बागेचा भाग. **वारूबाई** पहिला खेडवळ आणि जुना पोषाख बदलून बारीक कुंकू, बुचडा, गजरा घालून शालू नेसलेली अशी प्रवेश करते.]

**वारूबाई**—आतां उतरेल कीं नाहीं त्या भसाडतोंडया रागिणीचा श्रीमंतीचा दिमाख ! बाई, बाई, बाई ! शालू नेसलं म्हणजे किती हलकं हलकं वाटतं ! पांखरासारखी जशी तरंगतें आहें मी आकाशांत ! खेडं तें खेडं आणि शहर तें शहर ! नेसूं शालू असला म्हणजे सारींजणं टकमक पाहतात आणि मनुष्य कसं चटकन् नजरेंत भरून प्रसिद्धीला येतं. जाऊं दे बाई, उशीर झाला. रागिणीबाईंचे धुंद डोळे ह्या माझ्या शालूनें चक्क उघडलेच पाहिजेत ! ( घाईनें जाऊं लागते इतक्यांत वारोपंतास येतांना पाहून ) अगबाई ! स्वारी आली ! आतां कसं करूं ?

[ जरा बाजूला पाठमोरी होते. **वारोपंत** पोषाखांत प्रवेश करतो व पाठमोऱ्या बायकोचा भपका पाहून आश्चर्यानें ]

**वारोपंत**—( स्वगत ) अं ? ही कोण सोनटक्की ! आणि इकडं कुठं आली ! देवानं एक तोंडकसब दिल्यामुळं ह्या बायकांच्या ओळखी कशा झटपट होतात ! असली सजावट बायकांना किती खुलून दिसते हो; नाहींतर आमची ती खेडवळ म्हैस ! कमरेची नाटी जरा तरी अशी चापून चोपून नेसावी ! पण ही अशी पहात तर पहातच काय राहिली तिकडे ? आतां आपणच विचारावं कोण म्हणून ! ( पोषाखपगडी सांवरीत व घाबरत ) आपण-आपण-कोण-आपण-( समोर जाऊन व ओळखून ) कोण तूं ?

**वारूबाई**—होय, मीच हो. इश्श ! पण हें काय असं ? इतके डोळे वटारायला, शालूमुळं मी कांहीं बदललें का आहें ?

**वारोपंत**—हो, हो. बायकोच्या बायको कायम राहिलीस खरी !

**वारूबाई**—शोभतोना मला हा शालू ? बरी दिसतेंना मी ? ( जरा जवळ येऊन ) शहरांत आल्यापासून किनई शहाणी झालें आहें ?

**वारोपंत**—हेंच ना तुझ्या शहाणपणाचं प्रदर्शन ? तिकडे लांबच रहा. जवळ नाहीं यायचं. काय उधळपट्टी ही ! काय पैशाचा चुराडा !

**वारूबाई**—कसली उधळपट्टी ! कशी आतां सुरेख दिसतें मी ? तरी पण मला ठाऊक, पाहून तुमचे डोळे फाटायचेच म्हणून ! हा शालू मीं आपला माहेरच्या पैशांतून आणवला !

**वारोपंत**—भली झक मारलीस. माहेरचे तरी पैसेच ना ते ! चांडाळणी, एवढे एका रकमेनं तुला खर्च करवले तरी कसे ? अरे बापरे ! केवढी ही रक्कम ! माझ्या डोळ्यापुढं अंधेरी येते. कशाला आणलास तो ?

**वारूबाई**—कशाला म्हणजे ! असा थोडा जामानिमा केल्याशिवाय का आपल्या कवीश्वराला श्रीमंतांच्या मुली सांगून येतील ?

**वारोपंत**—चुलींत घाल तुझ्या त्या कवीश्वराला. कितीही श्रीमंतांच्या मुली आल्या तरी गौरीप्रमाणं त्या बापाची इष्टेट का बरोबर आणणार आहेत ? आजवर मोठी शहाणी समजत होतो तुला; पण मोठी शहाणी बायको म्हणजे इतर बायकांपेक्षां कमी मूर्ख इतकंच ! चल जा. तो शालू सोड आणि नाटी नेस आणि त्याची घडी घालून कर आतांच्या आतां परत. मला नाटी आवडते आणि नवऱ्याला आवडेल तोच पोषाख बायकोनं केला पाहिजे !

**वारूबाई**—समजलं का ? नवऱ्याची पत लोक बायकोच्या पोषाखावरूनच ठरवीत असतात ! हो, हा शालू मीं घेतला तो घेतला. आणि नेसलें आहें तो आतां कांहीं मी सोडायची नाहीं !

**वारोपंत**—हे तुझे चोचले मी मुळींच चालूं देणार नाहीं. सोड तो शालू आणि दे माझ्याजवळ ! मी बांधीन कुणाच्या तरी किफायतीनं गळ्यांत. जा. सोड म्हणतोंना ? [ अंगावर जातो.

**वारूबाई**—साफ सांगतें, मी कांहीं हा शालू परत करायची नाहीं !

**वारोपंत**—नाहीं, नाहीं. पहिलं खेडवळ पण लाजाळू तुझं प्रेम ह्या शहरी बायकांप्रमाणं वांकडी शालजोडी पांघरून मोठ्या धिटाईनं नजरबागांतून हिंडायला लागलं नाहीं का ? जा तर मग अशीच गांवभर मिरवत. ( अंगावर जाऊन ) चल, चल नीघ इथून ! घरांत येशील तर तंगडीच मोडून टाकतों. दाराशीं आलीस तरी नेसूं शालू आहे तोंवर तुला महारीण समजून वळचणीलाच बसवीन ! हो चालती. खबरदार माझ्यामागं आंत येशील तर !

[ घरांत जातो आणि दार लावून घेतो.

**वारूबाई**—फुटलं माझं कपाळ तें ! [ **रागिणीसह गौरी** येते



**चारोपंत**—दूर हो ! काडेचिराईताचा काढा पुढं आल्यासारखा वाटतो.

[ पृष्ठ ८७.

**रागिणी**—( वारूबाईला डोळे पुसतांना पाहून ) भली झाली ! फरवां मला जापवलंत नाहीं ! कशी झोंबली मिरची नाकाला !

**वारूबाई**—बरं ! बरं ! कशाला हो आलांत इथं, भांडायला ? आलांच आहांत तर पहा माझा शालू आणि व्हा चालत्या इथून.

**रागिणी**—तें कां ? बंगलीची मालकीण मी आणि तुम्ही कोण मला सांगणार जा म्हणून ? असले छप्पन शालू मीं पाहिले आहेत. मी आलें ती—

**गौरी**—तूं बाबांना द्यायची नोटीस वारोकाकांनीं लिहून तयार केली कीं नाहीं तें त्यांना विचारायलाचना ! तर मग चल आंत त्यांच्याकडे.

**रागिणी**—थांब ग जरा; वाईसाहेबांची रडकी सुरत तर जरा डोळे भरून पाहूं दे मला ! नवराबायकोंचं भांडण—

**गौरी**—पण तें होतं कां ?

**रागिणी**—दोघांचं लग्न लागतं म्हणून !

**गौरी**—होय का ? तर मग मला तें लग्नच नको वाई ! पण—केवळ लग्नामुळंच नवराबायकोंचं भांडण होत असेल तर रोज उठून जगांत साऱ्यांचीं हीं लग्नं होतात तरी कशीं ?

**वारूबाई**—लग्नाशिवाय साऱ्यांचा संसार अडतो म्हणून ! भांडणं होतात म्हणून कुणी लग्नं का लावीत नाहींत !

**रागिणी**—आणि लग्नं होतात म्हणून कुणी भांडणं का करीत नाहींत ! मूर्ख पोर कुठली ! म्हणे लग्नच नको मला ! कवीश्वरापाशींच तुझं लग्न करायचं !

**वारूबाई**—हो, हो तर ! प्राण गेला तरी असली सून पत्करायची नाहीं. नेसेल इरकेल आणि गांवभर फिरकेल ! झकपक पोषाखांत किती मूर्खपणा भरलेला असतो हें तारुण्यामुळं धुंद झालेल्या डोळ्यांना बिलकूल दिसत नाहीं !

**रागिणी**—नाहीं कसं बाई ! शालूंत गुंडाळलेला किती तरी मूर्खपणा इथं दिसतो आहे !

**कर्कशराव**—( पडद्यांतून ) वारोपंत, ए वारोपंत—

**रागिणी**—ही धिंडका इकडं कशाला आली आहे कुणाला ठाऊक !

**वारोपंत**—( प्रवेश करून आश्चर्यानें ) कुणीं हांक मारली मला ? आणि तुम्ही सारींजणं जमून इथं काय चाललं आहे ? शालू नेसलेलीच्या नेसलेली तूं अजून इथंच ?

**वारूबाई**—मग काय करूं ? जाऊन आतां राहतें भाऊजींकडेच दोन दिवस.

**वारोपंत**—( जाऊं लागते तों तिला अडवून ) खबरदार पुढं पाऊल टाकशील तर ! घर सोडून आहे काय भाऊजींकडे ! तुम्हां बायकांना नेहमीं थारेपालट पाहिजे. नाटी दिली तर शालूचा हट्ट; स्वर्गांत ठेवल्या तर नरकांत जाण्याचा आग्रह ! चल, बस तिकडे बंगल्याच्या वळचणीला.

[ हात धरून ओढतो.

[ **कर्कशराव** प्रवेश करतो. ]

**कर्कशराव**—ए-ए-ए-बायकोबेहाद्दर ! (वारोपंत वारूबाईचा हात सोडतो.) काय हा धुमाकूळ मांडला आहेस ? ती पोरटी गौरी कुठें गेली ? इथेंच आहेस ना ! कोणी पहायला यायचें तर गधडीला धुंडाळून काढावें लागतें ! बुच्च्या नाकाची बया गांवभर नाचे थयथया ! हो चालती घरीं आणि कुणी पहायला येणार म्हणून निरोप आला आहे, तर नाकांत नथ घाल. टाळक्यावर हा-हा-बुचडा नको, वेणी घालून घे, आणि हें फिरतीचें पातळ सोडून चांगलें गरतीचें लुगडें नेस. ( जवळ जाऊन मोठयानें ) आलें का ऐकायला ? वारोपंत, तुला हें आतां शेवटचें विचारायला आलों आहें. परवां म्हणत होतों तें कबूल आहे कीं नाहीं तुला ? बोल, फार झाले तुमचे थेर. कांहीं झालें तरी आज मी गौरीचें लग्न निश्चित केल्याशिवाय रहात नाहीं. हं, बोल लवकर.

**वारोपंत**—नवीन काय बोलायचं ? ह्यांत कवडी कमी व्हायची नाहीं. व्यवहार तो व्यवहार; हुंडा पांच हजार, करणी अडीच हजार ! ह्यांत कवडी कमी व्हायची नाहीं.

**कर्कशराव**—तर मग गौरीचें कवीश्वराशीं लग्न होत नाहीं ! ( वारूबाई वारोपंताकडे पहात राहते.)

**रागिणी**—नाहीं कसं—

**कर्कशराव**—चूप, कैदाशिणी ! इथें आलीस ती नवऱ्याला नोटीस द्यायची आहे ना ? झाली कीं नाहीं तयार ? ( रागिणी हातपाय आपटते. ) तुझें गो काय बिघडलें आहे ? हिला नवरा नकोसा झाला आणि तूं नवऱ्याला नकोशी झालीस वाटतें ? ( वारूबाई वारोपंताकडे जाते.)

**वारोपंत**—दूर हो, दूर हो ! काडेचिराइताचा काढा पुढं आल्यासारखं वाटतं ! दृष्टीसमोर नकोस. ( तिचा हात धरून ) जा, माझ्या समोरून—

**कर्कशराव**—ए बायकोच्या नवऱ्या, तिचा सोड आणि धर ह्या नवऱ्याच्या बायकोचा हात आणि जमवा नोटिशींचें मेतकूट. तिला फूस देतोस नाहीं का ? ए शालूच्ये ! चल माझ्याबरोबर; नवऱ्याला नोटीस द्यायची मी पण शिकवतों तुला हिकमत ! (वारूबाईचा हात धरून तिला फरफरा ओढीत नेतो.)

**वारोपंत**—माझ्या बायकोला फूस देतात—

**रागिणी**—आणि माझ्या इच्छेविरुद्ध गौरीचं लग्न ठरवितात—

**वारोपंत**—आतां नुसत्या नोटिशीबिटिशीनं भागायचं नाहीं, चला,—वहिनी, दावा बांधायचा विचार केला पाहिजे. गौरीचं लग्न निश्चित करूं नये असा मनाई हुकूम–चला, नक्की विचार ठरवूं. [ दोघें घाईनें जातात.

**गौरी**—छे, छे, छे, छे बाई ! आतां बरीक ह्या पाहणारांना स्वतःला दाखविण्याचा मला अगदीं कंटाळा, नव्हे अगदीं ओकारी आली ! पण काय करायचं ! अनेकांना दाखवीत बसायला नको असेल तर एकाची बायको झालं पाहिजे आणि एकाची बायको व्हायला नको असेल तर अनेकांना दाखवीत बसलं पाहिजे. हा विचार करायला आतां वेळ आहे कुठं ! आजोबा म्हटल्याप्रमाणं आजच मला कुणाची तरी बायको नक्की ठरवणार खास. हा वक्रतुंड्या कशाला येत आहे इकडे ? (**वक्रतुंड** येतो.) कां आलास रे ?

**वक्रतुंड**—लग्नरचना करायला. तुमचा कौमार्यनाशाविधि जुळवायला आलों आहें ! तो भलत्याशीं जुळवणं प्रचंड भीषण आहे ताईसाहेब ! गर्गशेप्रमाणें तुम्हीही परपुरुषासक्त होऊं नका. मग काय ? कवीश्वरांशीं सौभाग्यमिश्रित व्हायला तुम्ही करतांना कबूल ! विलंब नको.—लोकचेष्टित सुरू झालं ! कंदर्पाचा दर्प अनावर असतो म्हणून कवीश्वरांशींच सौभाग्यवती कर्मतत्पर व्हायला तयार व्हा. यजमानगृहीं दोघांचा संगम झाला आहे. आतां लग्नाची आपत्ति ओढवलीच पाहिजे !

**गौरी**—बस्स कर बाबा तुझं हें संस्कृत ! वक्रतुंड, कवीश्वरांची पत्नीघटना माझ्यांत नाहीं !

**वक्रतुंड**—तर मग तुम्हांला एका गुह्याची वेदना मला कर्तव्य आहे ! (पत्र देतो.)

**गौरी**—पत्र ! कसलं पत्र ! काय भानगड आणली आहेस ! कुणाचं ?

**वक्रतुंड**—त्याचं चर्वितचर्वण इथं नको.

**गौरी**—चल, चल तर लवकर. [ जातात. पडदा पडतो.

---

## प्रवेश चवथा

[ **स्थळ**—बंगल्यांतील गौरीचा दिवाणखाना. **वक्रतुंड** प्रवेश करतो.]

**वक्रतुंड**—( समाधानदर्शक हात हालवून-स्वगत ) ताईसाहेब, कवीश्वराबद्दलचा माझा लग्नोचित उपदेश सरळ कर्णरंध्रांत उत्तीर्ण करीनात म्हणून ह्या गुह्य पत्राची त्यांना वेदना कर्तव्य झाली. आतां त्या जीर्ण पुरुषाला दर्शनाकरितां आव्हान करतों. तेच भ्रष्ट ताईसाहेबांचं शोधन करतील आणि कवीश्वराशीं त्यांचं लग्न जुळवतील. आतां मी लग्नकर्मोत्तेजनार्थ गणेशेच्या मागं आग्रहकारक संकीर्तन सुरू करतों. [ जातो.

[ **गौरी** हातांत पत्र वाचीत वाचीत प्रवेश करते. ]

**गौरी**—आधीं खालीं सही कुणाची आहे बरं ? " तुझा बाप-वर्धमानराव " म्हणजे सोकाजीरावांना वडिलांकडून रागाचं पत्र आलेलं दिसतं ( वाचीत ) अं ! " तुझी सालस आणि महापतिव्रता पत्नी-गरीब बिचारी-तुझ्या राक्षसी छळणुकीमुळं झुरणीला लागून विरहानं मरायला टेंकली आहे. तुझी ही फटिंगशाही सोडून तूं ताबडतोब घरीं येणार नाहींस तर जी हजार पांचशेंची थोडीबहुत इस्टेट आहे, तिच्यावरचाही तुझा वारसा मी कायमचा नष्ट करीन." हें मी काय वाचीत आहें ! हाय रे देवा ! (किंचित् झीट आल्यासारखें करून डोकें टेंकते) सोकाजीरावांचं लग्न झालेलं-बायकोचा अमानुष छळ करतात-गरीब बिचारी मरायला टेंकली आहे ! एकूण सोकाजीराव, हें तुमचं चारित्र्य ! मघांचा तो भलताच फाजीलपणा-त्यानं बाई मी अगदीं बुचकळ्यांत पडलें होतें. पण आतां चांगला प्रकाश पडला-नव्हे, चांगलं अंजन मिळालं. हाय रे दैवा ! आणि याला मी माझा हा देह अर्पण करणार होतें; याच्या चरणीं माझं मौल्यवान् शील

आपखुषीनं वाहणार होतें; माझं सर्वस्व अर्पण करणार होतें ! माझ्या सरळ वृत्तीचा आणि विश्वासाचा फायदा घेऊं पाहणाऱ्या राक्षसा ! भाबडेपणानं तुझ्या कुरवाळणाऱ्या हाताला चाटूं पाहणाऱ्या गाईची मान कापणाऱ्या कसाया-( तो समोर दिसतो आहे असा आविर्भाव करून ) नको, माझ्याजवळ येऊं नको; तुझं हें बाह्यरूप ज्वालेप्रमाणें दिसायला मोहक पण हृदयाला जाळून टाकणारं आहे–जा, जा-त्याचं मला दर्शनही नको !

[झीट येऊन कोचावर पडते. **कर्कशराव** व **रागोपंत** प्रवेश करतात. ]

**कर्कशराव**—येवढ्या मोठ्यानें काय वाजलं ? रागया, पहा पहा, पोरीला कांहीं लागलेंबिगलें नाहींना ? ( रागोपंत तसें करतो. व कर्कशराव गौरीजवळ पडलेलें पत्र पाहून ) वक्रतुंडानें सांगितलें तेंच हें पत्र ! समजलें ! मला ठाऊक आहे त्यांतला काय प्रकार आहे तो. कार्टीला अंजन मिळायला पाहिजे होतें तें मिळालें ! कवीश्वर तरी गुलाम बराच नाटकी आहे कीं ? आतां त्याचें हें नाटक पुढें कसें कसाला लावायचं तें पाहतों, मीच आतां ! (गौरीजवळ जातो, डोळे भरून येतात.) फारच दुखावली पोर. उठलीस का बाळ ? झालीस का सावध ? अरे, बघत काय बसलास ? तुमच्याच दुर्लक्षामुळें हा पोरीवर प्रसंग आला, एरवीं पोर कशी गरीब. जा, जा, पाणीबिणी घेऊन ये. आणि तुझी ती गधडी कुठें गेली ? तिला पोरीची कांहीं काळजी आहे का ? झालीस का सावध बाळ ! (गौरी एकदम घाबरून अस्ताव्यस्त उठते व दोघांस पाहून कांपत बाजूस उभी राहते) काय ग दिवट्ये; कुळाला कलंक लावलास ! कोण, कुठला भामट्या आला, त्याच्यापुढें सारी लाज सोडलीस आणि आतां कशाला पदर सांवरतेस ? उरांत लाज नसेल तर उगीच ती झांकण्याच्या मिषानें पदराची तरी विटंबना कशाला ?

**रागोपंत**—निर्लज्ज ! बेशरम कार्टी ! पोटीं जन्माला येऊन चांगले वडिलांचे पांग फेडलेस ! आतां मी जगांत तोंड तरी कसं दाखवूं ? ह्या गोष्टीचा केव्हांच बभ्राही झाला असेल.

**कर्कशराव**—त्याला एकच उपाय. तरणी-ताठी पोर, कोणत्या सोकाजीशीं हितगुजाच्या भेटीगांठी होत असत, त्याच्याशींच लाव आतां लग्न ! निर्लज्जाला बेशरम, जोडा चांगला गरमागरम !

**गौरी**—कसाई ! शुद्ध कसाई आहे तो ! त्याच्याशीं मी कसं हो लग्न करूं ?

**रागोपंत**—ही अक्कल पहिल्यानं कुठं गेली होती ! गधडी शिंगाच्या शोधाला गेली आणि लांब कान होऊन आली !—आतां तरी उघडले का डोळे ? पहा, आमच्या तोंडाला काळं फासलंस, आतां तें धुऊन काढायचं तर—

**कर्कशराव**—पुरे, पुरे. जा गो, कोण तुझा तो सोकाजी का बोकाजी आहे त्याला शोधून त्याचा हात धर. स्वयंवर पाहिजेना तुम्हांला ? तुझा तूंच तो शोधून काढला आहेस, तुझी तूंच त्याची निवड केली आहेस, आतां कुरकूर कां ? तोच तुला आवडला पाहिजे. कुठें आहे तो आण त्याला. जा. नीघ !

**गौरी**—नका हो नका आजोबा. एवढे माझे धिंडवडे पुरेसे नाहीं का झाले ?

**कर्कशराव**—चूप ! जातेस कीं कान पकडून दाखवूं सूर्याचीं पिल्लें !

**गौरी**—प्राण गेला तरी त्याच्याशीं मी लग्न करायची नाहीं, असल्या सोद्याची का मी सौभाग्यवती होऊं ?

**कर्कशराव**—तें तत्त्वज्ञान नको माझ्याशीं. निघालीस कीं नाहीं ? कोण—

[तिचा हात धरून ओढीत दरवाज्याकडे जातो. तोंच **सोकाजीराव** आंत प्रवेश करतो. दोघेही चकित होऊन मागें होतात. कर्कशराव त्याला मुद्दाम डोकावून पाहतो. ]

**गौरी**—(एकदम किंकाळून) हा-हा-हाच हो तो; बाबा, हाच हाच तो—मेला. (एकदम रडें कोसळून रागोपंताकडे जाते.)

**रागोपंत**—(तिला थोडा वेळ हृदयाशीं धरून बाजूस करतो आणि त्वेषानें त्याच्या अंगावर जाऊन) नीचा—अधमा—

**सोकाजी**—(मागें होत) हो-हो पण ! मुलीला मागणी घालायला आलेला सद्गृहस्थ मी, आणि हा काय प्रकार आहे ? एकदम माझ्यावर असे तुटून कां पडतां ? काय झालं ? गौरीचा माझा प्रीतिविवाह ठरला—तिच्याच आग्रहावरून मी तिला मागणी घालायला आलों आहें. आणि हें काय ? तुम्ही चांगलें वयातीत गृहस्थ दिसतां आणि हे तर चांगले वयोवृद्ध आजोबा आहेत. कांहीं चालरीत, कांहीं शिष्टाचार—

**गौरी**—अशीच हो, अशीच गोड गोड बोलून मला भुलविली! काय सजावट, काय दिमाख, काय डामडौल, काय रसाळ वाणी! लांडग्या! बरी वेळेवर सुटलें तुझ्या कचाटयांतून.

**सोकाजी**—हें आहे काय गौडबंगाल? मला कांहींच समजत नाहीं. गौरी, लाडके, (जवळ जात जात) सुंदरी, हृदयेश्वरी, प्राणवल्लभे,-माझ्या सर्वस्वाच्या स्वामिनी—

[गौरी मागें जातां जातां दारापर्यंत जाते. तोंच **रागिणी** पुढें व **वारोपंत** मागें अशीं प्रवेश करतात, गौरी रागिणीच्या बाहूंत पडते.]

**गौरी**—आई, आई, आई! हा बघ ग मेला धटिंगण कसा माझा पिच्छा पुरवीत आहे तो!

**रागिणी**—उगी हं माझी बाळ ती! कोण रे तूं मेल्या? आणि तुला कांहीं लाज, लज्जा, भीड, मुरवत? आम्ही इथं इतकीं थोर थोर माणसं आणि हा पोरकटपणा चालवला आहेस तूं? निर्लज्ज! कांहीं चालरीत—

**सोकाजी**—मला माझ्या आईबापांनीं कांहीं एक शिकवलं नाहीं.

**वारोपंत**—अरे वारे फटाकडा! कोण आहेस तूं?

**सोकाजी**—हा सोकाजीराव—गौरीचा प्रीतिविवाहाचा नवरा आहे. आणि गौरी ह्या सोकाजीरावाची प्रीतीविवाहाची बायको आहे! आणि या गोष्टीला तुमची संमति घ्यायला केवळ शिष्टाचार म्हणून मी आलों आहें.

**रागोपंत**—चूप, भामटया, तूं कसा दिवटा आहेस आणि आजवर कसे दिवे लावले आहेस तें सारं समजलं आहे आम्हांला. हा पहा त्याचा पुरावा. (पत्र फेंकतो) आणि हा पोरकटपणा बंद करून चालता हो इथून एकदम.

**सोकाजी**—(हंसत) हा! हा! हा! हा! एवढयासाठींच का सारा हलकल्लोळ! म्हटलं येवढं झालं तरी काय! आहे, ह्या पत्रांतलं अक्षर न् अक्षर खरं आहे! पण त्यांत बिघडलं कुठं?। बापानं करून दिलेली नावडती बायको असेल घरीं; म्हणून काय मी प्रीतिविवाहानं माझ्या आवडीची दुसरी करूं नये?

**रागोपंत**—हा तर अगदींच लाज सोडलेला भडबुंजा दिसतो. बाबा—बाबा—

**कर्कशराव**—पहातों आहें मी सारें! तुम्हां गधडयांचा हलगर्जीपणा कोणत्या थराला गेला आहे तो! चालूं द्या, थोडी तंबाखू खातों आणि

मग बघतों काय करायचं तें. तोंवर चालूं द्या ! ( जेठा मारून तंबाखू चोळीत बसतो. )

**रागोपंत**—काय रे सोद्या, गौरीसारखी कुलीन मुलगी, भाबडी पाहून फसवलीस, तुला काळीज आहे का नाहीं ?

**सोकाजी**—हें पहा, आपण तिचे वडील दिसतां आणि ह्या बहुधा मातोश्री असाव्यात––

**रागिणी**—हो, मीच तिची आई आणि हे वडील.

**सोकाजी**—मग सांगा तर तुम्ही मला काय म्हणून दोष देतां ? गौरीची माझी पहिली भेट झाल्याबरोबर मीं लगेच ताडलं कीं, ह्या मुलीला बिलकूल गृहशिक्षण नसून तिच्यावर कोणाचा दाबही नाहीं. पाहिलं चांगलं स्थळ आहे, बघावं जमलं तर ! तुम्ही आईबापांनीं तिला अशी लग्नाशिवाय इतके दिवस ठेवावी कां ? आणि ठेवलीत तरी तिला अशी सुनाट सोडावी कां ! असली नवयौवना सुंदरी अनायासें मिळत असली तर कोण सोकाजी तिला हातची जाऊं देईल ?

**रागिणी**—हो तर, माझी गौरी कांहीं फुकाची नाहीं लागली, कीं वाटेल त्यानं यावं आणि तिला घेऊन जावं.

**वारोपंत**—जणुं कांहीं सार्वजनिक रस्त्यावरचं पक्व आम्रफलच तें ! कुणाही वाटसरूनं सहज जातां जातां दगड मारावा आणि आ करून बसावं कीं पडलंच तोंडांत !—अं ? असं का समजतोस तूं ? कोण आहेस तो हो चालता मुकाट्यानं इथून, कीं बोलावूं पोलीस ?

**सोकाजी**—बोलावाना खुशाल; मला कोणाच्या बापाची धास्ती आहे !

**रागोपंत**—हें पहा सोकाजीराव, झाल्या गेल्या गोष्टी विसरून जा आणि आमची चूक झाली, आम्हांला मेहेरबानी करून माफ करा.

**सोकाजी**—अशा गयावया करण्याचा कांहीं उपयोग नाहीं मामासाहेब ! गौरी मला मिळालीच पाहिजे. गौरी—

**गौरी**—गौरी, गौरी काय ? तुमच्यासारख्या गांवगुंडाशीं कोणती कुलीन मुलगी लग्न करायला तयार होईल ?

**सोकाजी**—कुलीन–कुलीन–कुलीन–पुष्कळ वेळां ऐकला तो शब्द तुमच्या घराण्याच्या कुलीनपणाचा ! हा रोज चाललेला धांगडधिंगा जगजाहीर आहे. तो तुम्ही नको मला शिकवायला. बायकोला घरांतून काढील तो

कुलीन-नवऱ्याला सोडून राहील ती कुलीन-आपल्या आचरणानं साऱ्या कुळाला लीन करील ती कुलीन—

**रागिणी**—ऐक, ऐक, काळतोंडे ! आज आम्हां साऱ्यांना खालीं माना घालायला लावल्यास ! पोटीं जन्माला येऊन कुळाला कलंक लावलास !

**रागोपंत**—तोंड काढून तिला बोलतेस, ती तूंच जरा जपून वागतीस तर कशाला आला असता असला प्रसंग ? ह्याचा दोष सर्वस्वी तुझ्याकडे आहे !

**वारोपंत**—आणि तूं काय कमी आहेस ? बायकोला घरांतून काढलीस—

**रागिणी**—अहो, अहो, तुमची सौभाग्यवती आहे का घरांत ? तिला काढून लावायला तेच आले असतील !

**वारोपंत**—नवऱ्यानं बायकोला पुष्कळ काढली घरांतून बाहेर; पण बायको मोठी कुलीन तर तिनं जावं कशाला झक् मारायला नवऱ्याला सोडून ?

**सोकाजी**—भांडणांत एकमेकांनीं एकमेकांवर घालून मुख्य गौरीचा विषय मी कांहीं टाळूं देणार नाहीं. हा सिद्धसाधकपणा मला समजतो ! देतां कीं नाहीं गौरी मला ? मला दोन बायका झाल्या म्हणून कांहीं जगाची मोठी उलथापालथ होईल असं नाहीं ! दोन बायकांचे दादले जगांत पुष्कळ आहेत. ही तुमची अमर्याद गौरी नीटपणें वागली नाहीं तर आणखी एखादी तिसरी-सुद्धां करीन मी !

**गौरी**—पण मी दुसरी व्हायला तयार होईन तर ना ?

**सोकाजी**—मामासाहेब, तुमचं हें खटलं नीटसं तुमच्या कह्यांत वागत नाहीं अशी ओरड आहे. करून टाका, तुम्हीसुद्धां आणखी एक लग्न !

**रागिणी**—काय तोंड ! काय तोंड ! बाई, बाई, बाई, बाई ! असं नव्हतं बाई आजवर कुणाचं पाहयलं ?

**सोकाजी**—आणि गौरी, आतां मला नाकारून कसं चालेल ? कोण दुसरा पत्करणार तुला ?

**वारोपंत**—कुणीही पत्करील—माझा कवीश्वर पत्करील !

**रागिणी**—हो, कवीश्वर पत्करील !

**सोकाजी**—मूर्खच असेल तो असली वधू पत्करायला !

**गौरी**—असली म्हणजे कसली हो ? असं काय मीं केलं आहे ?

**सोकाजी**—हिच्यासारख्या बोलबाला झालेल्या मुलीला माझ्यासिवाय

दुसरा कोण पत्करणार ! असल्या गोष्टीकडे लोकसमाज हजार डोळ्यांनीं पहात असतो. असं काय केलं आहे म्हणून विचारतेस ? मामासाहेब, आपल्या कन्येचा हात—

**गौरी**—अधमा, काय रे ? काय ?

[ क्रोधांत हात पुढें करते; तो झटकन् धरून.

**सोकाजी**—सांगूं ? कीं निमुट्यानं लग्नाला कबूल होतेस ! बोल, दाखवूं ?

**रागोपंत**—( मध्यें पडून हात हिसकावून स्वतःचे हातांत धरतो ) काय, काय, काय दाखवणार तूं ?

**सोकाजी**—प्रेमाची खूण बरी । ~~दंतव्रण हातावरं~~

**गौरी**—नराधमा ! कसाई ! दुष्ट कसाई !

**सोकाजी**—~~प्रेमाची खूण बरी । दंतव्रण हातावरी ।।~~

**रागोपंत**—~~आणि विचारतेस; काय केलं म्हणून ?~~

**गौरी**—~~पाहीलं केलं~~ बाबा, शुद्ध चांडाळ आहे ता ! तुमच्याकडं येऊन सरळ मागणी घाला असं मी ह्याला सांगत असतांही ह्या चांडाळानं माझा हात धरला, आणि कसा अगदीं कडकडून चावला मेला ! पुढचं हें नाटकच करायचं होतं मेल्याला !

**सोकाजी**—आतां कर पाहिजे तीं ढोंगं ? तुझं शील शुद्ध आहे तरी हातावरचा हा शिक्कामोर्तब लोकांचे—माझ्या दृष्टीनें माझा तुझ्यावरील हक्क प्रस्थापित करायला पुरेसा आहे. तुम्ही सारीं शहाणीं असाल तर या साऱ्या गोष्टींचा नीट विचार करा. गौरीचं माझ्याशींच लग्न झालं पाहिजे ! तिचा ब्रह्मदेव, पिता, नव्हे पितामह जरी कुठून अवतरला तरी हिचं-माझं लग्न आतां कुणाच्याही बापाला टाळतां येणं शक्य नाहीं ! [ एकदम निघून जातो.

**कर्कशराव**—( तंबाकूचे हात झाडीत पुढें येऊन ) म्हटलें, परस्पर चांगली उडते आहे, आपण कशाला तोंड घाला मधें ! आणि घातलें असतें तर तुम्हां बुळ्यांप्रमाणें त्याच्याशीं असें वादंग घालीत बसलों नसतों. या म्हाताऱ्याच्या मनांत असतें तर त्या बोकाजीला असा गुरगुरूं दिला असता होय ? पाठींत बडगा घालून पेंकाटच मोडलें असतें त्याचें. पण म्हटलें—फार चांगलें झालें ! असलें खट्याळ ब्रह्म दृष्टीस पडल्याशिवाय नाहीं ह्या शिरजोर बायका वठणीवर यायच्या. त्याच्याशींच गौरीचें लग्न लावून दिलें पाहिजे !

**रागिणी**—कां बरं ? असल्या दमदाटीला भीक घालायला आम्ही काय मेलेलींच कां माणसं आहोंत ! देवानं तोंड दिलं आहे, बोलावं वाटेल तितकं वायफळ, आणि द्याव्या दुसऱ्याला धमक्या. आजच्या आज-गौरीचं कवीश्वराशीं लग्न निश्चित करून तें लावून टाकूं पहिल्याच मुहूर्तावर ! मग पाहूं हा काय करतो तें !

**कर्कशराव**—ती गोष्ट आतां होणें नाहीं. तुम्हाला नसली तरी कुलकलंकाची मला लाज आहे. तो टाळायचा तर गौरीचें लग्न सोकाजीशींच झालें पाहिजे.

**गौरी**—त्या गोष्टीला मी साफ कबूल नाहीं. एकदां सांगितलं, आणखी एकदां निक्षून सांगतें.

**कर्कशराव**—कारटे, लांब जीभ काढून बोलतेस ? तो भटारसोद्या गांवभर डांगोरा पिटील, त्याची कांहीं लाज ? तुझें काय, घराण्याचें नांव आजच आम्हाला पुसून टाकायचें नाहीं !

**वारोपंत**—घराण्याचं नांव पुसून टाकण्यासारखं काय झालं आहे हो असं ? असल्या लफंग्यांना फुकट दम द्यायला काय लागतं ? कावळा वर पुष्कळ ओरडला म्हणून खालीं घर का मोडणार आहे ? कवीश्वराशीं हिचं लग्न आतांच्या आतां निश्चित करून लगेच उरकून टाकूं म्हणजे साऱ्यांचीं तोंडं आपोआप बंद होतील !

**गौरी**—उगीच तुमचं हा कीं तो हें भांडण हवं कशाला ? मला आतां मुळीं लग्नच करायचं नाहीं !

**रागोपंत**—म्हणजे, लोकांचा संशय अधिकच दृढ होणार ! तूं कांहीं केलं नसलंस तरी लोक तसं समजतील का ? लग्नाशिवाय राहिलीस म्हणजे हेच धंदे करायला पाहिजेत म्हणून जन्मभर तुझ्या नांवानं सारे लोक नाकं मुरडतील. हा तर कपाळाला कायमचा डाग राहणार !

**गौरी**—म्हणून काय त्या पशूशीं लग्न करूं, होय ? पशु—निव्वळ पशु ! त्याच्याशीं लग्न प्राण गेला तरी करायची नाहीं ! हा सारा त्रास चुकविण्यासाठीं आतां जीव देतें मी.

**रागिणी**—नको ग माझी बया ती ! मुलगी माझी आहे. साफ सांगतें, कवीश्वराशींच मी तिचं लग्न लावणार !

**वारोपंत**—हो; मुलीवर सर्वस्वीं आईचाच अधिकार; ती म्हणते त्याप्रमाणं कवीश्वराशींच गौरीचं लग्न लागलं पाहिजे. ही गोष्ट ठरविण्याचा अधिकार मुलीची आई आणि मुलाचा बाप या दोघांनाच असतो.

**कर्कशराव**—अरे जारे अधिकारवाल्या, पाहूं दे कुणाची माय व्यायली आहे ! (स्वगत) अरे चोरा, हुंडा उकळावयाचा आतां असा डाव खेळतोस काय ? पण म्हणावें या कर्कशरावाशीं गांठ आहे ! (उघड) गौरी, झाले एवढे बस्स तुझे थेर ! जीव दिला तरी कलंक चुकत नाहीं. उलट कारटी पळपुटी निघाली, तोंड दाखवायला जागा नाहीं; म्हणूनच जीव दिला असला बदलौकिक आमचा होऊन बसेल. ह्या चिकटयाला काय ? याला पैसे तेवढे दिसतात आणि लौकिक न दिसायला तुझ्या डोळयांचीं खांचरें झालीं काय रे ? लोक शेण घालतील आमच्या तोंडांत ! तें कांहीं नाहीं; राग्या, उपाध्याला बोलावणे पाठवून मी मुहूर्त पहातों. आतांपासूनच लागा तयारीला. गौरीचें लग्न त्या सोकाजीशींच लावावयाचें !

**गौरी**—आजोबा-आजोबा !—

**कर्कशराव**—(स्वगत) या पोरीचा मात्र आतां अंत पाहिल्यासारखा होतो आहे. पण या वारोपंताकरितां आणि आमच्या या दिवाण्या सूनबाईकरितां त्या नाटक्याचें हें नाटक जरा असेंच चालविलें पाहिजे. पोरीवर मात्र नजर ठेवायास हवी, नाहींतर मघां बोलल्याप्रमाणें फटकन कांहींतरी करायची ! [ जातो.

**रागिणी**—काय ? मुखस्तंभासारखे असे नुसते उभे काय राहिलांत ? मामंजींचा हा निव्वळ दुराग्रह आहे, तोसुद्धां का चालूं देणार तुम्ही ? आपली गौरी कवीश्वरालाच द्यायची— [ **कवीश्वर** येतो.

**कवीश्वर**—(प्रवेश करून) छे, छे, छे. काकू, मी नाहीं तयार तिच्याशीं लग्न लावायला. (स्वगत) तुमचं साऱ्यांचें सरळ जुळेतों मी कुठला जुळवून घ्यायला. (उघड) छे, छे, काकू, आपल्याला नाहीं कबूल.

**वारोपंत**—वा, वा, वा, वा, वा रे बेटया ! तुझा बाप इथं उभा आहे म्हटलं ! त्याच्यासमोर पुन्हा जीभ काढलीस तर फाडकन् मुस्कट फोडीन. समोपंत, गौरी कवीश्वराला द्यायला होतोस कीं नाहीं बऱ्या बोलानं कबूल ?

**रागिणी**—एवढं सुद्धां माझं नाहीं ना ऐकायचं ? तो थेरडा आल्यापासून

इतके कसे चळलांत तुम्ही ? काय, बोलायचं सुद्धां नाहीं माझ्याजवळ ? ( हात-पाय हापटीत ) काय करूं ?

**वारोपंत**—काय रे रागोपंत, बोलत कां नाहींस ?

**रागोपंत**—बाबांच्या विचारापुढं मी कांहींच बोलत नाहीं.

**गौरी**—बाबा—

**रागोपंत**—गौरी, बाळ—

**रागिणी**—काय, एवढं सुद्धां माझं नाहीं ऐकत तुम्ही ?

**वारोपंत**—अहो, हे असे सरळ नाहींच ऐकायचे. चला. फिर्यादीशिवाय दुसरा मार्गच नाहीं, यांना ताळ्यावर आणायला ! तूं काय समजला आहेस रागोपंत ? आईच्या संमतीशिवाय मुलीचं लग्न ठरवूं नये असा मनाई हुकूम आजच्या आज कोर्टांत मिळवितों. चला, चला वहिनी. [ दोघें जाऊं लागतात.

**रागोपंत**—रागिणी, रागिणी, विचार कर. कोर्टांत जाऊन सरकारदरबारीं आपल्या लौकिकाची बोंब करणार तूं ? रागिणी-( वारोपंत तिला जलदी करतो, दोघेंही जातात.) हाय-हाय ! हे माझ्या संसाराचे धिंडवडे !

[ कपाळावर हात मारून जातो.

**गौरी**—बाबा, बाबा ! ( परत येऊन ) आतां करूं तरी काय ? बाबा, आजोबा त्या गुंडाशीं माझं लग्न लावल्याशिवाय रहात नाहींत. देवा ! कशी रे ही वेळ आणलीस ? अविचारी पोरपणानं, मागला पुढला विचार न करितां ह्या दुष्टाच्या मीं भेटी घेतल्या खऱ्या; पण देवा, याबद्दल ही शिक्षा-याच्याशीं लग्न लावण्याची ही जबर शिक्षा-फार नाहीं का रे ? आतां जीव देण्याशिवाय सुटणूकच नाहीं म्हणायची ! त्या दिवशीं कवीश्वरांनीं मला लग्नाविषयीं शेवटचं विचारलं, त्याच वेळीं पतीची निवड म्हणजे काय, याचा थोडा विचार केला असता तर आज हा प्रसंग कां येता ? हे पहा, कवीश्वर अजून इथंच आहेत. किती थोर हृदय ! त्या दिवशीं मीं त्यांना नकार दिल्यावर त्यांनीं पुन्हा ती गोष्ट एकदां सुद्धां दर्शविली नाहीं. आज मी काढूं का त्यांच्याजवळ ती गोष्ट ? करतील कबूल ? गौरी, असेल का तुझं एवढं भाग्य ? पाहूं या नशीबाची परीक्षा. (पडदा वर होतो तों **कवीश्वर** चोपडी काढून लिहीत बसलेला पाहून ) अं ? या वेळीं

काय लिहीत बसली आहे स्वारी ! (मोठ्यानें सक्रोध) दुसऱ्यावर प्रसंग आल्याचा काळ तोच लेखकांच्या स्फूर्तीची वेळ ! काय चाललं आहे लिहिणं !

**कवीश्वर**—नाटक पुरं करतों आहें. अशा वेळीं कुणीं बडबड केलेली लेखकांना बिलकुल आवडत नाहीं. मग ती बडबडणारी त्या लेखकाची अगदीं प्राणवल्लभा पत्नी का असेना !

**गौरी**—मर्मज्ञ कवींचं अंतःकरण अतिशय प्रेमळ आणि मन फारच हलकं असतं; दुसऱ्याचं दैन्य पाहून चट्कन् त्याच्या डोळ्याला पाणीसुद्धां येतं, असं आपलं मीं ऐकलं आहे. निदान त्याचं लक्ष तरी त्या दैन्यप्रसंगाकडे वेधायला नको का ! नाटक पुरं करतों म्हणतां तर त्यांतल्या नायिकेचं काय केलंत ! सांपडली का ती ?

**कवीश्वर**—पळून गेली सटवी ! कंटाळा आला, म्हटलं आतां कसंबसं करावं पुरं आणि जावं निघून लवकर आपल्या गांवाला.

**गौरी**—हो; पण नायिकेचा कांहीं तरी निकाल तर लावला पाहिजेना ?

**कवीश्वर**—ती गेली पळून म्हणून सांगितलं ना एकदां !

**गौरी**—अरेरे ! गरीव बिचारी ! पण स्त्रीच ती आणि स्त्रीचं लोकदृष्ट्या असं विटंबनात्मक चित्रच रेखाटायला पुरुषांना आवडतं हूं !

[लांब सुस्कारा सोडते.

**कवीश्वर**—अं ! इतका लांब सुस्कारा सोडतेस, ती माझ्या नायिकेबद्दल तुला कां इतकं वाईट वाटतं बुवा ?

**गौरी**—तुम्ही इथं आलांत ते कुठलं तरी नाटक लिहायला. खडाष्टक हें नाटक मींच सुचवलं आणि त्यांतली तुमची नायिका कोण आहे तें पण मला ठाऊक आहे. तिला तुम्हींच पळायला लावून 'पळपुटी पोर' असंच शेवटीं लोकांपुढं तुम्ही तिचं चित्र ठेवणारना ? ( डोळे भरून ) बरं—

[ निराशेनें तोंड फिरवून डोळे पुसते.

**कवीश्वर**—( स्वगत ) आतां हिला आणखी जास्त त्रास देणं बरं नाहीं. ( मोठ्यानें ) हें पहा गौरी, संविधानकाचीं सूत्रें जुळवतां जुळवतां शेवटीं प्रसंगच तसा आला त्याला माझा तरी काय इलाज !

**गौरी**—या बोलण्यांत काय अर्थ आहे ! लेखक म्हणजे नवी सृष्टि निर्माण-

कर्ते प्रति ब्रह्मदेवच ! मोठे मर्मज्ञ ते ! त्यांनींही इतरेजनाप्रमाणंच नायिकेला समजावं आणि—आणि—

**कवीश्वर**—हं बोल, बोल. हें आडून आडून बायकी डोकावणं पुरें झालं. माझी नायिका म्हणजे कोण समजलीस तूं ?

**गौरी**—जसं काय ठाऊकच नाहीं तुम्हांला, अं ? अगदीं वदवायचंच का माझ्या तोंडून ? कवीश्वर, तुम्ही मूळ इथं आलांत ते मला मागणी घालायला-चना ? यापेक्षां अधिक स्पष्ट काय सांगूं मी ? हें पहा किनई, भांडखोरपणामुळं माझ्या आईबापांना वेळ नाहीं; म्हणून माझी मीच आपली दाखवतें हो तुम्हांला.

**कवीश्वर**—ओ-ओ-ओ-ओ-पुष्कळ वेळां पाहिली आहे तुला मीं. आतां काय आणखी पहायचं राहिलं आहे तुझं ?

**गौरी**—नाहीं हो कवीश्वर. एकदां नीटपणं माझ्याकडे पहा तर खरं ! दैवाच्या चक्रांत सांपडून अडलेली, वडिलांच्या धमकावणीनं बावरलेली, आणि संसाराच्या भयाण कल्पनेनं गांगरलेली, मृत्युसुद्धां जवळ घेत नाहीं म्हणून असह्य तळमळीनं हीनदीन झालेली अशी गौरी आजवर तुम्हीं कधीं पाहिली आहे का ? पहा, पहा कवीश्वर ! माझ्यावर प्रसंग कोणता आहे तो पाहून तरी मला ह्या वेळीं झिडकारूं नका हो ! ~~तुम्ही दूर ढकला कीं जाऊन~~ पडलेंच मी त्या नराधम सोकाजीच्या बाहुपाशांत—त्या नरकवासांत—

**कवीश्वर**—अं ! सोकाजीचा शोक भागला ? वा ! अजून तर तुझे सारे शोक पुरे व्हायचे आहेत—मनासारखे दागिने, मागशील तेवढे पैसे, बोलशील तितके शब्द, नेसशील तितके शालशालू; बसशील तितक्या गाड्याघोडीं, राहशील तितका राजवाडा; भोगशील तितका भोग—झाला पुरेसा इतक्यांत ? आपलं स्वतःचं स्वयंवर मांडलेलं तूं, मागणी घालायला आलेल्यांना धिक्कारून तुझी तूंच त्या सोकाजीला मागणी घातलीस ! तुझ्या स्वतःच्या निवडीचा तो आणि आतां हें काय ?

**गौरी**—~~ही माझी रडकथाच या प्रश्नाचं उत्तर देईल;~~ मीं तोंडानंच का सांगितलं पाहिजे ? तुम्हांला सारं ठाऊक आहे. माझी हितोपदेशाची बेपर्वाई, अनुभवशून्य वागणूक, अविचारी अधिरता, माझा मूर्खपणा-गाढवपणा हें सारं माझ्या तोंडूनच तुम्हांला वदवायचं असेल—

**कवीश्वर**—कांहीं जरूर नाहीं. पण झाल्या गेल्या गोष्टी ! आतां मीं काय करणार बुवा ! हो; इथलीं सारीं भांडणं अजून जशींच्या तशीं सुरूच आहेत; तुझी आई, माझे बाबा, घरचीं भांडणं अपुरीं वाटून कोर्टांत गेले ! माझी आई—घराबाहेरच आहे आणि रागोकाका, आजोबा—छे बुवा ! बाबा आई येवोत न येवोत, मी आपलं चंबुगबाळं उचलून आज घरीं निघून जाणार ! हो ! तुम्ही सारीं भांडणाच्या प्रत्येक प्रसंगाला विजयादशमीचा मुहूर्त समजून शिष्टमर्यादेचं सीमोल्लंघन करतां; आतां बसा लुटींत हेंच दुष्परिणामाचं नकली सोनं ! मी काय करणार ! गाडी कधींची आहे ? जाऊं दे मला, तयारी करायची आहे ! [ जाऊं लागतो.

**गौरी**—( अडवून सदरा धरते ) ह्या भांडणाबद्दल मलाच एकटीला शिक्षा आणि तीही इतकी जबर ! हें काय हो असं ? बाकी सारीं भांडत असलीं तरी मीं दिलं ना भांडायचं सोडून ! दैवयोगानं माझ्या हातीं लागलं तें हें खरं खरं सोनं आहे. तेंच मी लुटींत राहीन आणि केव्हांही हातचं जाऊं देणार नाहीं. कवीश्वर, नाहींच का माझी तुम्हांला दया येत ?

**कवीश्वर**—वा ! तूं तर अगदीं बनवलासच मला नवरदेव ! छे ! छे ! जाऊं दे मला.

**गौरी**—मी नाहीं तुम्हांला जाऊं द्यायची ! नाहीं तरी तुम्हीं मला विचारलंच होतं लग्नाबद्दल. तुमचे पाय धरले ते आतां नाहीं मी सोडायची. इतक्या उप्परही निघून जाल तर मी पण अशीच तुमच्या मागें येईन !

**कवीश्वर**—वा ! हें काय भलतंच ! सोड, जाऊं दे मला. मी तरी काय करूं ? तुमच्या घराण्याचा दुर्लौकिक होऊं नये म्हणून त्या सोकाजीशींच तुझं लग्न झालं पाहिजे, असं काका आणि आजोबा म्हणतात, तें खोटं कसं ?

**गौरी**—पण तुम्हीं मनांत आणलं तर ह्या सर्व गोष्टी टाळतां नाहीं का येणार ?

**कवीश्वर**—म्हणजे ? मी तुझ्याशीं लग्न लावलं पाहिजे हेंच तुझं म्हणणं ? नको रे बाबा ! दडप्या दहा ओरडून संसाराच्या सारीपटावर नेहमीं तुला वांकडे तेराचं दान मागून डाव खेळावासा वाटणार आणि तुझ्यापुढं उठल्या-बसल्या मला दान मागावं लागणार म्हणजे पोबारा तेरा ! चल, सोड, जाऊं दे मळा.

**गौरी**—छे-छे! एकदां सांगितलं ना मी आतां मुळींच भांडायची नाहीं म्हणून. मौन हा मोलाचा अलंकार मी कायमचा मुखावर धारण करणार आहें. मीं माझा दृष्टिकोन आतां बदलला आहे बरं.

**कवीश्वर**—बायकांचा दृष्टिकोन नेहमींच बदलत असतो! काल सोकाजी-रावाकडे, आज कवीश्वराकडे, काल तोंडाळाकडे; आज मुक्याकडे.

**गौरी**—नको गडे आतां पुन्हा पुन्हा त्या गोष्टी.

**कवीश्वर**—हां! असं गडे गडे करून मला कबजांत घेण्याचा बेत दिसतो आहे तुझा. बरं! तुझ्यामाझ्या लग्नासंबंधीं पुढं पाहतां येईल. पण तुला धास्ती वाटत असलेल्या संकटाचं निवारण बरीक मी खात्रीनं करतों. गौरी, या वेळीं एक गोष्ट बरीक लक्षांत ठेव. तुझं लग्न कोणाज़वळही होवो, गृहिणी या नात्यानं पुढील गोष्ट केव्हांही विसरूं नकोस. स्त्री-स्वातंत्र्याचा मीही भोक्ता आहे. पण निसर्गानं स्वातंत्र्याची आणि कर्तव्याची अशी कांहीं सांगड घालून ठेविली आहे कीं, कर्तव्याशिवाय स्वातंत्र्य हें नेहमीं नाशालाच कारणीभूत व्हायचं. लग्न म्हणजे दोन अगदीं निरनिराळ्या व्यक्तिरूपी प्रवाहांचा संगम मिसळतांना थोडीशी खळबळ व्हायचीच; पण किती? संगमाच्या रम्य देखाव्याइतकीच! नवराबायको दोघंही आपापलं परस्परांविषयींचं कर्तव्य करतील तर भांडणाचा प्रसंग केव्हांही येणार नाहीं. कर्तव्य म्हणून परमेश्वरानं मनुष्याला दिलेली अशी एक अमोलिक देणगी आहे, कीं तिचा सांठा प्रथम संसाराच्या पतपेढीवर ठेवावा म्हणजे मग वेळ येईल तेव्हां वाटेल तशा सुखाच्या हुंड्या सोडल्या तरी त्या रुजू होऊन पटल्याच पाहिजेत. संसार म्हणजे आधींच रूक्ष आणि खडतर, त्यांत बायकांचं जर कांहीं अत्यंत पवित्र कर्तव्य असेल तर तें असल्या संसाराला चटकदारपणा आणणं हेंच होय. पुरुषांचं-हो; पुरुष म्हटल्याबरोबर मला बाबांची आठवण झाली. तुझ्यामाझ्या लग्नाचं तूं म्हणतेस खरं; पण बाबा पांच हजार रुपये घेतल्याशिवाय ऐकणार नाहींत. इतकंच काय त्यांच्या बोलण्यावरून वाटतं, ते सारी इस्टेटसुद्धां मागतील.

**गौरी**—मागेनात! मला तें कांहीं समजत नाहीं. त्याच्यावर आतां आपणच कांहीं तरी उपाय काढला पाहिजे.

**कवीश्वर**—उपाय-पण काय काढणार? बाबा आणि काकू, अविचारानं

प्रत्यक्ष फिर्यादीलाच गेलीं; त्यांच्यासुद्धां साऱ्यांनाच चांगली अद्दल घडेल असाच काहींतरी उपाय काढायला हवा. सांपडेल; पण मी सांगेन तस्सं वागायला तूं तयार होशील तर!

**गौरी**—कां नाहीं होणार! संसार चटकदार करायला मला आतां शिकलंच पाहिजे. शिवाय नाटककार लिहील त्याप्रमाणंच नायिकेनं नको का वागायला!

**कवीश्वर**—नायिकेनं प्रसन्न होऊन ह्या वेळीं नायकाला एक गोड—

[ पडदा पडतो.

## अंक तिसरा समाप्त

# अंक चवथा



## प्रवेश पहिला

[ **स्थळ**—न्यायकोर्टाबाहेरील जागा. **वारोपंत** आणि **रागिणी.** ]

**वारोपंत**—तीन वाजले, अजून पुकारा कसा होत नाहीं ! आज जरुरीच्या मनाईहुकमाची चवकशी ! वादीप्रतिवादी, दोघांसही हजर राहण्याचा हुकूम ! रागोपंतही अजून कोर्टांत आलेला कुठं दिसत नाहीं. मोठा मनुष्य तो. त्याच्या येण्यावर तर कोर्टानं पुकारा करण्याचं ठेवलं नसेल ? वहिनी, समन्स लागलं आहेना त्याला ?

**रागिणी**—कालच लागलं. पण भाऊजी, बेलीफ समन्स घेऊन आला, तेव्हां माझी स्थिति अशी चमत्कारिक झाली म्हणतां, अगदीं हिरमुसली, एकदम रडवेलीच झालें हो मी ! आपण केलं हें बरं केलं का ? अशी पहिल्यापासूनच सारखी मनाला टोंचणी लागली आहे ! वाटतं, फिर्याद काढून घ्यावी; मग होईल तें होईल !

**वारोपंत**—वा ! वा ! वहिनी, आजवर खटपट केल्याचं चांगलं श्रेय मिळणार ! पहिल्यापासून पाहिलं तर कच्च्या दिलाच्याच तुम्ही. काय चमत्कार आहे ! दोघांचं एका ठिकाणीं जमेना, पण एकाला दुसऱ्याशिवाय गमेना ! छे, छे, छे ! माझा मित्र तो, फुकट फुकट त्याच्याविरुद्ध मी या भानगडींत पडलों. इकडे काम नाहीं तें नाहींच, आणि तिकडे त्याच्या मैत्री कायमची रामराम ! बायका म्हणजे अस्थिर बुद्धीच्याच, त्यांच्या नादीं शहाण्यानं लागूं नये हेंच खरं !

**रागिणी**—तसं नव्हे हो भाऊजी. मीं आजवर गाजविली, आतां हे मामंजी आले म्हणून, नाहीं तर ते का माझं ऐकत नव्हते ! का माझ्यावर त्यांचं प्रेम नाहीं, ( डोळे भरून ) कीं माझं त्यांच्यावर नाहीं ! पुढं जन्मभर तरी त्यांच्याजवळच संसार करायचाना !

**वारोपंत**—मग ! या फिर्यादीनं रागोपंताला काय फासावर का चढवायचं

आहे वहिनी ? तुम्ही बायको तर मीही त्याचा मित्रच आहेंना ? मलाही त्याचं कल्याणअकल्याण पाहिलंच पाहिजे. गौरी तुमच्या पोटची पोर, तिला त्या भड-बुंजाला द्यायचा म्हाताऱ्याचा हट्ट, त्याला ह्या रागयानं संमति द्यायची, म्हणजे तिच्या जन्माचं मातेरं करायचं ! तिला कवीश्वरासारखा नवरा मिळवून देणं, हीच ना माझी तरी खटपट आहे ? आणि तुमचं तर तें न टाळतां येण्यासारखं कर्तव्य आहे. पहा बुवा ! नाहीं तर मी आपला जातों कसा ! मग तुमचं तुम्ही काय वाटेल तें करा. ( जाण्याचा आविर्भाव करतो. )

**रागिणी**—हां, हा, भाऊजी निघालात कुठं ? गौरीचं कल्याण मला पाहिलं पाहिजे हें खरं; पण—

**वारोपंत**—खरं ना ? त्यासाठींच तर माझा एवढा आग्रह. नाहींतर हा सारा उपद्व्याप करण्याची मला कांहीं जरूर आहे का ?

**रागिणी**—खरं ! पण—पण माझ्याप्रमाणं त्यांना नाहीं का गौरीच्या कल्याणाची काळजी ? जाणूनबुजून ते तिला खाईंत लोटायला कसे हो तयार होतील ?

**वारोपंत**—नाहींच व्हायचा. माझा रागोपंत म्हणजे जरा तोंडाळ असला तरी एरवीं फार सच्छील, गरीब आणि मोठा प्रेमळ मनुष्य—

[ रडवेल्या मुद्रेनें उसासा सोडतो.

**रागिणी**—( साश्रु ) प्रेमळना ? खरेंच प्रेमळ ! ( हेंच दोन तीन वेळां दोघें म्हणतात. )

**वारोपंत**—फार लायक, सज्जन आणि गुणी. एक एक म्हणाल तर हजारांत सांपडायचा नाहीं त्याच्यासारखा कुणी. पण—त्या थेरड्या ब्रह्मसमंधानं पछाडलं आहेना त्याला—आजिवात गिळून टाकलं आहे !

**रागिणी**—मामंजी—मामंजी बेरड कोंकणांतून आला आणि माझ्या संसाराचा सत्यनाश केला मेल्यानं !

**वारोपंत**—पुरा सत्यनाश केला बेरडानं ! जळली त्याची सुरत ती ! त्याचा हट्टी आणि दुराग्रही स्वभाव अजून तुम्हीं पुरा ओळखलांत नाहीं वहिनी ! आपलं खरं करण्यासाठीं तुमच्यासारखं गृहिणीरत्न घरांतून काढून लावायची त्यानें पर्वा केली नाहीं, त्याला गौरीच्या कल्याणाची काय दिक्कत वाटणार ? समजलांत का वहिनी ? ही फिर्याद रागोपंताविरुद्ध नाहीं; त्या थेरड्याचा

नक्षा उतरण्यासाठीं आहे हें विसरूं नका. तो इथं येताच ना तर फिर्यादीचा प्रसंगच आला नसता! नव्हे, सरळपणें ऐकता तरी काय जरूर होती? ह्या निर्वाणीच्या उपायाशिवाय त्याचं थोबाड बंद पडण्याची शक्यता असती तर मींच तुम्हांला कोर्टाची सल्ला दिली नसती. [ **रागोपंत** येतो.

**बेलीफ**—( किंचित पुढें येऊन ) रागिणी मर्द रागोपंत कटकटे हजर है?—रागिणी मर्द रागोपंत—हजर है? रागोपंत कर्कशराव कटकटे हजर है? रागोपंत कर्कशराव—हजर है? रागोपंत कर्कशराव—

**रागोपंत**—हजर आहे. ए बेलीफ, मुन्सफसाहेबांना म्हणावं मेहेरबानी करून पांच मिनिटं थांबा. मी आलोंच.

**बेलीफ**—ठीक आहे रावसाहेब. आपण येईतों मुद्दामच त्यांनीं आतांपर्यंत खटला तहकूब ठेवला होता. लवकर या. [ जातो.

[ रागिणी उदासतेनें रागोपंताजवळ येऊन उभी राहते. दोघें हताश नजरेनें एकमेकांकडे पहात राहतात व न बोलतां सुस्कारे सोडतात. दोघांचे डोळे भरून येतात. इतक्यांत पडद्यांत वर्तमानपत्रें विकणारा मुलगा ओरडतो.]

**मुलगा**—'आठवड्याचा संसार'—ताजी बातमी-नवलाची खबर-एका मोठ्या मनुष्याच्या संसाराचें चित्र-येथील पोस्टखात्याचे मुख्य अधिकारी रागोपंत कटकटे आणि त्यांची बायको रागिणीबाई कटकटे यांची कोर्टांत काडी मोडून मागण्याची फिर्याद—

**रागोपंत**—ऐक, ऐक!

**मुलगा**—( पडद्यांत ) 'आठवड्याचा संसार—' किंमत एक आणा.

**रागोपंत**—( संतापानें ) कोण उपद्व्यापी लोक तरी! ह्या वर्तमानपत्रकारांना छापायला दुसरा मजकूरच नाहीं कीं काय? हा माझा संसार आणि हे माझे धिंडवडे! शहरभर-देशभर ही माझ्या लौकिकाची दवंडी! जा, जळतोंडे कैदाशिणी, कोर्टांत जा, आणि वाटेल तसा माझ्यावर हुकूमनामा मिळव. आपलेच दांत आणि आपलेच ओंठ! कुणीं कुणाजवळ भांडायचं? मला तक्रार करायची नाहीं, मला कोर्टांत हजरच व्हायचं नाहीं मुळीं. जा!—

**वारोपंत**—चला, चला वहिनी. हें आपलं आयतंच काम झालं! [ नवऱ्या-

पुढं उभं रहायचं नाहीं तुमचं संकट टळलं आणि भांडणाशिवाय तडकाफडकीं निकाल मिळणार ! आतांच्या आतां मनाईहुकूम–चला, चला.

[ पुन्हा पडद्यांत—'फक्त एक आणा'—'आठवडयाचा संसार'—'वधू पाहिजे' म्हणून गमतीची जाहिरात—रागोपंत कटकटे—उमर वर्षे पंचे-चाळीस—मोठी नोकरी—पुष्कळ इस्टेट—लग्नाला तयार—. 'आठवडयाचा संसार'—'किंमत एक आणा.]

**रागोपंत**—काय, 'वधू पाहिजे' म्हणून माझी जाहिरात ! राम राम ! ह्या उपद्यापीपणाचा कळस झाला—कोण हा नराधम !

**रागिणी**—काय ? मी धडधडीत जिवंत असतांना दुसरी बायको ! (चिडून) कुणाची माय व्यायली आहे हळद लावून उभं राहायची ? माझ्या छातीवर सवत नाचवणार—

**वारोपंत**—पहा, तुमचं तुम्हीच पहा. चलायचंना कोर्टांत ?

**रागोपंत**—जा जा ! बाबा म्हणतात तेंच खरं ! घरांतली बायको बाहेर गेली–म्हणजे तिच्या जागीं दुसरी आलीच पाहिजे. अजून तुला शरम नाहीं वाटत ? दुसरी येऊं द्यायची नसेल तर सरळ घरचा रस्ता पकड.

**रागिणी**—जगांतल्या ह्या मेल्या साऱ्या वधू एकदांच्या सौभाग्यवती कां होऊन जात नाहींत ! म्हणजे बायको असलेल्या नवऱ्याला, सांगून जायला म्हणून कुणी रहायला नको ! ( त्वेषानें ) मामंजी म्हणतात—

**रागोपंत**—हो मामंजी म्हणतात. नवऱ्याजवळ असलेल्या बायकोचं घरांत थाटणं आणि घर सुटलेल्या बायकोच्या कपाळीं पोळपाटलाटणं ! जा–जा–कोर्टांत.

**वारोपंत**—चला, चला बहिनी कोर्टांत ! माझा गरीब बिचारा मित्र रागोपंत जें काय बोलतो, त्याचा बोलविता धनी वेगळाची ! तो कोण तें आलंना ध्यानांत ? मामंजी बरं, तुमचे मामंजी !—चला— [ **वक्रतुंड** येता

**वक्रतुंड**—( घाबरलेला प्रवेशून ) यजमान—यजमान—ताईसाहेब—यजमान—गौरी—

**रागोपंत**—अरे काय ? काय, झालं काय वक्रतुंड ? गौरी काय आजारी पडली कीं कांहीं अपघात झाला ? काय, काय झालं ! सांग लवकर.

**वक्रतुंड**—( रडक्या सुरानें ) ताईसाहेब—ताईसाहेब लंबायमान झाल्या, अस्तंगत झाल्या हो !

**रागोपंत**—काय, काय म्हणतोस वक्रतुंड तूं ? गौरी नाहींशी झाली ? गौरी नाहींशी झाली ! हाय, हाय ! शेवटीं या थरावर गोष्ट आली ! रागोपंताच्या दुर्लौकिकाचा कडेलोट झाला ! माझ्या दुर्लौकिकाचा लोक आतां भंडारा लुटतील ! जगाला मी तोंड तरी कसं दाखवूं ? नको, संसार नको, जीव नको—पोरीनं तोंडाला पुरी पुरी काळोखी फांसली–कारटी सांपडूं दे एकदांची, तिच्या गळ्यांत धोंड बांधतों, माझ्याही बांधतों आणि देतों विहिरींत दोघेंजण जीव !

[ जलदीनें जातो. मागें वक्रतुंडही साश्चर्यसखेद मुद्रेनें जातो.

**बेलीफ**—(किंचित् बाहेर येऊन) रागिणी मर्द रागोपंत हजर आहे ?

**रागिणी**—(भानावर येऊन) गौरी नाहींशी झाली ! आतां काय करायचं आहे मला त्या फिर्यादीशीं ? जा; म्हणावं, काढून टाका माझी फिर्याद–( बेलीफ जातो.) गौरी नाहींशी झाली हा रे देवा ! पोरीनं फार चांगले पांग फेडले कुळाचे ! आतां मला तरी जगून काय करायचं आहे ?–काय करूं ! जीभ ओढूं का डोकं फोडूं ! मामंजी–मामंजी–मामंजी–शेवटीं तुम्हींच, तुम्हींच माझ्या सर्वस्वाचा घात केलात हो–मामंजी ! आतां जातें आणि तुमच्याच नांवानं विहिरींत जीव देतें. [ वैतागानें जाते.

**वारापंत**—वहिनी–वहिनी–आतां काय करावं ! हें तर सारं उलटसुलटच होऊन गेलं. रागोपंतांची इस्टेट राहो, पण आतां नुसते पांच हजार रुपये तरी मिळतात कीं नाहीं, कुणाला ठाऊक ! [जातो.

[पडदा पडतो.

---

## प्रवेश दुसरा

[**स्थळ**—विहीर असलेला बागेचा भाग. **वारूबाई** जुन्या वेषांत येते.]

**वारूबाई**—छे ! छे ! छे ! कधीं नाहीं ती दहाबारा दिवसच ह्या शहरांत येऊन राहिलें तर मनाला अगदीं वीट येऊन गेला. काय देहाची धावपळ आणि

काय जिवाचा आटापिटा ! शांति कशी ती क्षणभरसुद्धां नाहीं ! काय भेटीची धावाधाव आणि काय भांडणाची तोंडातोंडी ! आणि बाई, नोटिसा काय, फिर्यादी काय, तरण्याताठ्या कुलीन मुलीचं पळून जाणं काय... बाई, बाई, बाई ! हें शहर नको, हा व्याप नको आणि हा संतापही नको ! त्या मेल्या शालूसाठीं नवऱ्याजवळ भांडायचं आणि मग हींच त्रांगडीं करीत बसायचं कीं नाहीं ! नको ग बाई ! आमच्या भांडखेड्यांत कसं नेहमीं अगदीं शांत आणि सामसूम ! रोज भांडायची वेळ येते, पण थोडंसं भांडलं, झालं; पुन्हा आपली चट्टादिशीं एकी ! तिथं असल्या शहरी शालूची मुळीं गरजच लागत नाहीं. गुरं सोडायचीं, वासरं पाजायचीं, म्यांव म्यांव करीत घरभर मागं मागं फिरणाऱ्या मनीशीं खेळायचं, शेजारच्या गरीब मुलांच्या हातांवर एवढंतेवढं गोडधोड द्यायचं, आंधळ्या आनंदीला भिक्षा घालायची, चंद्रा भोईणीला चार दोन आणे हातउसने द्यायचे, काशी कासारणीला दिढीवाढीचा पावपसा दाणा घालायचा—त्याला काय करायचा शालूनूविलू ! आणि नेसायचा तरी त्यांच्यासाठींच ना ! त्यांनाच जर मी उभेलावण्यांत बरी दिसलें तर हवा कशाला तो ! आणि मेल्याला अंगावर सांभाळायचा कोण त्रास तरी ! भांडण विकोपाला जाणारसं पाहून टाकला सोडून आणि केला अपराध कबूल. त्याबरोबर झाली स्वारी खूष आणि आपणच ठेवून घेतला ! हें आमचं आपलं खेडवळ भांडण !

[ **गंगशा** घाबरत घाबरत प्रवेश करते.

**गंगशा**—छे ! इथंसुद्धां नाहींतच ते—कुठं—नाहींत; सकाळपासून सारखी शोधतें आहे.

**वारूबाई**—कुणाला ? गौरीचा कांहींच पत्ता नाहींना अजून ?

**गंगशा**—नसो मेला; पण कवीश्वरांचा पत्ता नाहीं हो ! कवीश्वर नाहींसे झाले हो ! जरा दिसले नाहींत म्हणजे मला कसं अगदीं चुकल्याचुकल्यासारखं होतं. कुठं आहेत ते ? तुम्हांला—छे ! तुम्हांला तरी कुठून कळणार !

**वारूबाई**—कवीश्वर नाहींसा झाला—माझा कवशा नाहींसा झाला ! अजून जेवायला आला नाहीं खराच; पण एखादे दिवशीं करतो भलताच उशीर ! म्हटलं येईल अजून. पण तो नाहींसा झाला कशावरून म्हणतेस गंगशे ?

**गगेशा**—आतां कशाचे येतात ते ? काकू, मला काल रात्रींच संशय आला हो !

**वारूबाई**—अगबाई, आतां काय करूं ? ते सुद्धां घरीं नाहींत; जळलं मेलं तें कोर्ट, हे तिकडे कशाला गेले आहेत कुणास ठाऊक ! देवा रे देवा ! पोर कुठं गेला असेल, कुठं जेवला असेल ! आई, अंबाबाई, पोरगा लवकर सुखरूप घरीं येवो-सोळा सोमवार करीन हो मी ! कवशा, कवशा, कुठं रे गेलास ! आईला टाकून कसा गेलास रे ! ते कांहीं टाकून बोलले असतील. मीच दुर्दैवी, मीच कपाळकरंटी-त्यांना कशाला दोष ! गगेशे, पहा ग पहा कुठं. त्यांना तरी बोलावून आण.

**गगेशा**—ते पहा, घाईघाईनं कुठं तरी जात आहेत ! काकासाहेब, अहो काकासाहेब ! इकडे मी विहिरीच्या बाजूला गगेशा हांक मारतें आहें, कवीश्वरांचा पत्ता नाहीं; कवीश्वर नाहींसे झाले ! लवकर, लवकर या.

**वारूबाई**—बरं झालं बाई, ते तरी जाले. कुठें जातील, शोध तरी करतील त्याचा ! शहरची वस्ती--कुठं चुकला कीं कांहीं अपघात ! नको रे देवा ! मन चिंती तें वैरी न चिंती ! [**वारोपंत** येतो.

**वारोपंत**—काय म्हणतेस, कवीश्वराला पत्ता नाहीं ! अग, गेला असेल कुठं; इतकं घाबरायला काय झालं ? गगेशे, गौरीची काय बातमी आहे ? कांहीं ठावठिकाण !

**कर्कशराव**—( पडद्यांत ) कोण ओरडलें तिकडे ? घरांत एकसुद्धां कुणी नाहीं; गेलीं कुठें सारीं ? मेलीं कीं काय ? का त्या कारटीप्रमाणें काळें केलें साऱ्यांनीं ! घासलेट ओतून आग लावून देतों घराला आणि मीही जातों निघून साऱ्यांचे दिवस करायला ! कोण बोललें तिकडे ? ( प्रवेश करून ) गगेशे, गधडीचा कांहीं ठावठिकाण ? मसणांत गेलें एकदांचें मढें तिचें !

**गगेशा**—हो, अशी सहजासहजीं सांपडायला बसली आहे ! मला पहिल्यापासून ठाऊक, मोठी चवढाळ कावेबाज मुलगी—

**कर्कशराव**—ह्या अलीकडच्या पोरी-घर खायला आलेल्या डांकिणी ह्या ! ह्यांना कांहीं आयशीची, का बापसाची, का आजल्याची थोडी तरी मुर्वत ! ह्या घरचिचुंद्या चुकचुक करीत इथें तिथें हळूच डुकल्या काढतील आणि कुणाबरोबर कुठें चटदिशीं नाहींशा होतील त्याचा पत्ता लागायचा नाहीं !

**गगेशा**—अशीच पहिल्यापासून ही गौरी मोठी ढंगी ! काल रात्रींपासूनच कुठं दिसत नाहीं ! एके दिवशीं तर त्या सोकाजीचा आणि हिचा हातांत हात ! मीं आडून प्रत्यक्ष डोळ्यांनीं पाहिला !

**कर्कशराव**—मग गधडे, लांब करून जीभ आतां सांगतेस, ती त्याच वेळीं हें नरककुंड कां उघडलें नाहींस ? उभी भाजून काढली असती ढालगज भवानीला ! हिला मी आतां कुठें शोधूं ! रागयाला धाडला असता ठेशनवर, तर तो त्या अवदसेच्या नादीं लागून कोर्टांत जाऊन बसला आहे !

**वारोपंत**—दोघेंही परत आलीं माझ्या मागोमाग ! तीं पहा इकडेच येत आहेत. मी हा आतांच कोर्टांतून आलों !

**वारूबाई**—तिकडसुद्धां नव्हताना कवीश्वर ? तो सुद्धां रात्रींपासूनच मला कुठं दिसला नाहीं. तुम्ही तरी जा हो ठेशनावर आणि पहा त्या दोघांना.

[ **रागोपंत रागिणी**सह प्रवेश करतो.]

**रागोपंत**—तोसुद्धां गेला का ? . तर मग तीं दोघं बरोबरच पळून गेलीं हें नक्की ! त्यानंच तिला पळविली !

**कर्कशराव**—सोकाजीशीं लग्नतिथीसुद्धां ठरविली–तिकडून आणखी बेअब्रू ! गांवांत काय बोभाटा झाला आहे ! आमच्या तिकडे कोंकणांत कुणबटांच्या आणि भेडग्यांच्या पोरी अशा पळून जातात ! हे घाणेरडे चोचले—छे, छे, छे ! ही भेडग्यापेक्षां भेड झाली. हें एकंदर प्रकरण इतकें चिघळलें आहे, इतकें किळसवाणें झालें आहे, कीं त्याला लागू पडतील असे अधिक घाणेरडे शब्दच आतां राहिले नाहींत. तो तुझा दिवाणा कारटा ! इथें आल्यापासूनच बोक्याचा गौरीवर डोळा होता ! आला नाहीं तोंच बागेंत निर्लज्ज भेटलीं आणि अंगाला खेटलीं. त्यानेंच पळविली तिला !

**वारूबाई**—छे हो ! असं कधीं व्हायचं नाहीं. माझा कवीश्वर मोठा गुणाचा आहे. आणि किती भोळा आहे म्हणून सांगूं ?

**वारोपंत**—आज्ञाधारक तसाच ! माझ्या शब्दाबाहेर आजवर कधीं गेला नाहीं ! तो हें असलं गलिच्छ काम करील ! शक्यच नाहीं.

**रागोपंत**—कां बरं ? तं चिकू आणि तो तुझाच मुलगा ! पांच हजार रुपयांचं घोबं मारायला मिळावं म्हणून गौरी पाहिजे; तें मिळेना तेव्हां तूं

फूस दिली असशील त्याला तिला पळवून न्यायची ! आण कुठं आहे ती माझी गौरी ! ( अंगावर जाऊन ) कुठं आहे गौरी ? बोल.

**रागिणी**—बोल, बोल मेल्या, कुठं आहे माझी गौरी ? पाव्हणं भेटीस आलं आणि लोणी खाऊन गेलं. कशाला हो पत्र लिहून हा महामारीचा उपद्रव इथं आणलात ? गौरी—गौरी—

**कर्कशराव**—( तिच्या अंगावर जाऊन ) चूप भसाडतोंड्ये, दिवस रात्र भांडायचें तर पोरीचें असेंच व्हायचें ! त्याबाबत जबाबदार तुम्हींच तिची आईस बापूस ! पोरांची काळजी तुम्हीं घ्यायची नाहीं म्हणजे अशीच गांवांतल्या एखाद्या हजामानें घ्यायची ! हीं दोघें आलीं, तो तुमचाच मसुदा ! एखादें पोर झालें नाहीं हें नशबिच आमचें ! चांगलें केलें पोरानें; एरवीं नाहीं उघडायचे तुमचे साऱ्यांचे फुटलेले डोळे ! काय रे, बऱ्या बोलानें दोघांना परत आणतोस कीं पहायचा आहे चमत्कार !

**वारोपंत**—हा काय माझ्यावर भलताच आरोप ! हा कारटा असे दिवे लावील हें माझ्या ध्यानीं, मनीं, स्वप्नींही नाहीं ! मी कशी त्याला फूस देईन ! गद्धा ! अब्रू घालवली माझी ! जन्माला आला तेव्हांच कां मरून गेला नाहीं !

**कर्कशराव**—बस्स कर हा मानभावीपणा. तूं असा सरळ कुठला ऐकायला फिर्यादी पाहिजेतना तुला ? फौजदारीचा वरवंटा फिरवल्याशिवाय नाहीं तूं मऊ यायचास ! पोरीला पळवून नेल्याबद्दल त्या तुझ्या कारट्यावर आणि त्याचे मदतगार म्हणून तुम्हां दोघांवर आतांच्या आतां फौजदारी फिर्याद दाखल करतों !

**वारूबाई**—अगबाई ! देवा रे देवा !

**वारोपंत**—( घाबरून ) हा काय प्रकार चालवला आहे तुम्हीं ? देवाशपथ सांगतों, मला ह्यांतलं कांहीं एक माहिती नाहीं. विनाकारण फौजदारीची पाळी कशाला आणतां ? रागोपंत, तूं तरी जरा विचार कर.

**रागोपंत**—( उसळून ) कसला, कसला रे विचार करूं मी ? दे, दे, हिला आणखी फूस दे माझ्यावर फिर्यादी करायची ! माझी घरंदाजाची अब्रू चव्हाट्यावर मांडलीस, मला जीव देण्याची पाळी आणलीस, आतां कोणत्या तोंडानं—सांगतोस विचार कर म्हणून ? बेशरम !

**वारोपंत**—आतां काय करावं ? हा काय प्रसंग आला ! ह्यांतून कसा सुटूं ?

**कर्कशराव**—मला विचार. हा सारा घोंटाळा राम्याच्या आणि सूनबाईच्या भांडखोर स्वभावामुळें झाला असला तरी तुझ्याही हुंड्याच्या दुराग्रहामुळें आणि तुझ्याच चिथावणीनें झालेला आहे तरी तीं आतां दोघें सांपडलीं तर कवीश्वराच लग्न हुंडा न घेतां गौरीशीं लावून देण्याचें कबूल कर ! काय ऐकूं आलें का ?

**वारोपंत**—वा ! वा ! हा गहजब माझ्यावर काय म्हणून ? आधीं नसते आरोप करायचे आणि मग फौजदारीची धास्ती घालून वर असली दडपशाही ! मी नाहीं ऐकणार. तुमची इच्छा नसेल तर कवीश्वराला गौरीही देऊं नका आणि हुंडाही देऊं नका. मिळतील आम्हांला असल्या छप्पन्न हुंडा देणाऱ्या गौरी ! हीच कांहीं जगांत लग्नाची एकटी मुलगी नाहीं; आणि मुलीसाठीं वाटेल तो हुंडा देऊन तिचं लग्न करायला तयार असणारे मुलीचे बापही कांहीं सारेच आज मेले नाहींत. म्हणे हुंडा न घेतांच कवीश्वराशीं गौरीचं लग्न करा. खासा न्याय ! मला नाहीं कबूल---

**गगेशा**—( एकीकडे ) नकाच कबूल करूं काकासाहेब ! फंदी पोर नकोच ती. दुसऱ्या पुष्कळ मुली इथं आहेत हो, मी सुद्धां आहें.

**वारोपंत**—चल, धांद्रट कुठली ! ( जाऊं लागतो. )

**कर्कशराव**—वारोपंत, खबरदार पुढें पाऊल टाकशील तर ! अहोरात्र तोंड वाजवायला पाहिजे, आतां बंद करून कुठं चाललास ? बोका कुठला ! दूध पाहिलें, आला वासावर ! इतके दिवस चोरटीं कारस्थानें करायला शरम नाहीं वाटली ? दूध देखलें पण बडगा नाहीं देखला ! ( जाण्याचा आविर्भाव दाखवून ) काय ? नाहीं ऐकत तूं ? पोलिसचा बडगाच पाहिजे तुला. वक्रतुंड्या !

[ **वक्रतुंड** येतो. ]

**वक्रतुंड**—( वारोपंतासमोर येऊन अडवून ) निजधामास जाऊं नका. यजमानांचे आज्ञांकित होऊन कवीश्वराशींच गौरीचं ब्राह्मण्य स्थिर करा. इथंच स्थानापन्न व्हा. यजमान आपलं सेवन करायला उद्भवलों आहें. आज्ञा व्हावी.

**कर्कशराव**—जा लौकर. गौरीला कवीश्वरानें पळवून नेल्याची ठाण्यावर खबर दे, आणि एक आरोपी इथून पळून जात आहे त्याला पकडून कैद करण्यासाठीं चार शिपाई बरोबर घेऊन ह्याच पावलीं परत ये, जा.

**वारोपंत**—या थराला ही गोष्ट नेण्यांत काय अर्थ आहे ! माझा कवीश्वर अशी गोष्ट कधींच करणार नाहीं ! त्यानंच गौरीला पळविली हें आधीं सिद्ध होऊं द्या, मग पुढें काय करायचें तें पाहतां येईल. चला, आतां विलंब नको. सारीजणं होईल तितका दोघांचा शोध तरी करून पाहूं. चला–वहिनी, तुम्हीं इकडे जा. अग म ाझ्याबरोबर चल. (जातां, जातां) जर का पोरगा गौरीबरोबर सांपडला तर तंगडंच मोडून टाकीन गुलामाचं ! चला, चला, आजोबा चला.

**कर्कशराव**—हं, चल. पुढें चल. अरे गुलामा, माझ्याशीं गांठ आहे ! काय सिद्ध करूं ! बरं, वरं !

[ **कर्कशराव** व **रागोपंत**—यांच्याशिवाय सर्व जातात.

**रागोपंत**—बाबा, तुम्ही सारीं त्यांना शोधायला मोठ्या उत्सुकतेनं जातां, पण माझा ह्या जाग्यावरून पायच हालत नाहीं. मनाचा उद्वेग होता तसाच कायम आहे. दोघं सांपडलीं काय, न सांपडलीं काय, दोघांचं लग्न झालं काय न झालं काय, मला आतां कशांतच प्रेम वाटत नाहीं. माझी अब्रू आणि लौकिक एकदां गेला तो गेला—आजवर घरांतल्या घरांत झांकली मूठ सवा लाखाची, ती चव्हाट्यावर कायमची उघडी झाली ! आतां कांहीं झालें तरी ती माझी मला परत मिळणें शक्य नाहीं ! तेव्हां जगण्यांत तरी काय राम राहिला ! आतां संन्यास घेणं, किंवा जीव देणं याशिवाय दुसरी तोडच राहिली नाहीं. मला संसारांत बायकोपासून आजवर जें सुख मिळालं त्यावरून पुढं काय मिळेल तें दिसतंच आहे ! जित्याची खोड मेल्याशिवाय जात नाहीं हेंच खरं ! पण मनुष्यानं कांहीं तरी विचार केला पाहिजे. ही अवदसा तो कधीं काळीं करील—छेः ! संन्यासही नको. नको; मागच्या आठवणी काढीत तळमळत दिवस कंठायचे ! नको, नको. [क्षमा करा बाबा; जगणं असह्य झालं, जातों—जीव देतों— ( विहिरीकडे जातो, तेथें **कर्कशराव** त्याला अडवतो.)

**कर्कशराव**—शीः ! काय ह्या भागूबाईच्या गोष्टी करतोस ? लेका, माझ्या पोटीं आलास खरा; पण बापाला बेटा बिलकुल शोभत नाहींस तूं ! तुझ्यासारखीं लैबर्डीलेंबर्डी पोरें–झालें गेलें, आतां काय त्याचें ! पहिल्यापासून असा तूं मऊच लेंका–अगदीं भुसभुशीत, एक बायको तुला संभाळवेना ! असल्या

 मिळून

ऐकलं

छप्पन्न कडक लक्ष्म्यांना शिस्त लावायचा माझ्यांत अजून दम आहे, काय समजलास ? पुरुषानें प्रयत्न कधीं सोडूं नये. संन्यास, संन्यास, संन्यास घेणार तूं ? प्रथम त्रिदंडी तरी घे.— जीवच देणार ? जीव द्यायचा असला तर जरा थांब; गौरी गेली ती कवीश्वराबरोबरच आहे ! तुझी बायको ताळ्यावर आली तर पाहूं एक युक्ति करून. तुला पोहायला येतें का ? लहानपणीं शिकवलें तें विसरलास ? हं टाक उडी. आणि चारपांच गटांगळ्या खा. कुणी पहायला आला तर आणखी बुडया मार. मरत नाहींस, टाक. ( रागोपंत उडी टाकतो. ) धावा ! धावा ! राग्यानें जीव दिला ! विहिरींत उडी घेतली ! धावा, धावा, कुणी तरी लवकर या हो ! रागोपंत मेला ! मेला; या-या, कुणीतरी लवकर या हो. रागोपंत मेला ! धावा ! धावा !

[ **रागिणी** व **वारूबाई** घाबरून धावत येतात.

**रागिणी**—काय ? त्यांनीं उडी घेतली ? धावा, धावा, कुणी तरी त्यांना काढा हो बाहेर ! कुणी तरी आंत उडी टाका हो ! भाऊजी, मामंजी—छेः ! इथं कुणी नाहीं दुसरं ! भाऊजी–काय ! मामंजी टाका उडी ! नाथ—कुणी नाहीं तर थांबा, मीच येतें तुमच्या–पाठोपाठ—

[ उडी टाकायला जाऊं लागते तों **कर्कशराव** तिला अडवून ]

**कर्कशराव**—हां ! खबरदार पुढें जाशील तर ! मनाला एकदम धक्का बसल्यामुळें जीव राहीना म्हणून ओरडलों खरा; पण आतां वाटतें, होत आहे तेंच चांगलें. त्याला सोडून गेलीस तेव्हां तुला तरी कुठें हवा आहे तो ? बरें झालें मेला एकदांचा कारटा ! तुला स्वेच्छेनें बेताल वागायला पाहिजे, आयताच तुझ्या मार्गांतला कांटा कायमचा दूर झाला. आतां चारी दिशा मोकळ्या आहेत. बस खुशाल वाऱ्याजवळ भांडत !

**रागिणी**—नाहीं हो नाहीं मामंजी; कांहीं असलं तरी ते मला हवेत ! बोलवा हो कुणाला तरी ! काढा हो कुणी त्यांना बाहेर ! धावा हो धावा ! या-हो-कुणी तरी लौकर या; धावा,-धावा—

**कर्कशराव**—कुणाची माय व्यायली आहे येऊन त्याला वर काढायची ? लंगडें मोडून त्यालाही देतों जलसमाधि—

**रागिणी**—असं हो काय करतां मामंजी ? अहो, ते तुमचेच पुत्र ना ? टाका हो उडी मामंजी ! मी कशी असलें, तरी तो तुमच्या पोटचा

खबर साठीं च

गोळा ! त्याच्यावर हो असे कसे निष्ठुर होतां ! मामंजी, माझे सारे अपराध पोटांत घाला, मला पदरांत घ्या; पदर पसरतें, मला चुडेदान द्या हो ! टाका टाका हो उडी ! आतां काय करूं ? कुणाची करुणा भाकूं ? तुमच्या पायां पडतें; मामंजी ! क्षणाच्या कसोशीनं कायमचं दूर होणारं हें माझं सौभाग्य राखा ! त्याची मला भिक्षा घाला हो, भिक्षा घाला मामंजी ! [त्याचे पाय धरते.

**कर्कशराव**—घाल-घुसळ्ये आणि तोंडमुसळ्ये, हो दूर पाय सोडून, नाहींतर लाथ मारून फोडून टाकीन तें तुझें चावरें तोंड ! भांडायला हवें नाहीं ? त्रासला पोर तुझ्या कटकटीनें; बरें झालें सुटला एकदांचा ! आयुष्याचा नाश होतो, राम कां रे म्हणाना !

**रागिणी**—माझं सौभाग्य तेवढं राखा हो राखा, मामंजी ! टाका, टाका हो उडी ! अतःपर मी त्यांच्याजवळ अगदीं भांडायची नाहीं हो !

**कर्कशराव**—आणि दुसऱ्याजवळ ? माझ्याजवळ ?

**रागिणी**—तुमच्याजवळ नाहीं, कोणाजवळ भांडायची नाहीं. टाका, टाका हो उडी !

**कर्कशराव**—नाहीं भांडणार ?

**रागिणी**—नाहीं, नाहीं, नाहीं. देवाची शपथ, कुलस्वामिनीची शपथ, मामंजी तुमच्या पायाची शपथ, माझ्या नाथांची शपथ घेऊन सांगतें, अतःपर मी कुणाजवळ कधीं म्हणून भांडायची नाहीं. मामंजी, मामंजी, टाका हो उडी !

**कर्कशराव**—थांब तर, टाकतों उडी. त्या तिथें उभी रहा. डोळे मिटून अनन्यभावानें कृतकर्माबद्दल परमेश्वराची क्षमा मागून धावा कर ! शंभो ! (ती त्याप्रमाणें हात जोडून उभी राहते)—घटका गेली, पळें गेलीं, तास वाजे ठणाणा । आयुष्याचा नाश होतो, राम कां रे म्हणाना ॥ राम कां रे म्हणाना ॥ (**रागोपंत** पुढें येतो.) हा पहा तुझा नवरा; त्या दयाघन परमेश्वरानें एकवार तुला क्षमा करून त्याला जिवंत काढला, आणि दिला तुला वरप्रसाद !

**रागोपंत**—संसारसागरांत खरोखरच बुडालों होतों तों आज बाबांच्या पुण्याईनं तरलों ! (कर्कशरावाचे पाय धरतो.)

**रागिणी**—आणि त्यांच्याच पुण्याईनं माझं सौभाग्य मला परत मिळून आज माझ्या खऱ्या संसाराला प्रारंभ झाला. (रागोपंताजवळ जाते) ऐकलं

का ? पहिली रागिणी मरून हा तिचा पुनर्जन्म झाला आहे असं समजायचं ! बोलक्यापुढं मुकाळू, रागिटापुढं हंसराळू आणि छांदिष्टापुढं विसराळू होण्याचं ठरवलं आहे मीं आजपासून ! ~~सासूबाई, नमस्कार करतें~~ ! ( नमस्कार करते. )

~~कर्कशराव—अष्टपुत्रा सौभाग्यवती भव !~~ [ **वारोपंत** येतो.

**वारोपंत**—छे बुवा ! पुष्कळ तपास केला; पण दोघांचा कांहीं मागमूसच लागत नाहीं कुठं ! जवळपास कुणी त्यांना जातांना पाहिल्याचंही सांगत नाहीं. वक्रतुंड गेला आहे थोडा लांबवर, ठेशनावरही मनुष्य पाठविला आहे मीं. इकडे कांहीं मोठी आरडाओरड झाल्याचं कळलं म्हणून लवकर परतून आलों !

**कर्कशराव**—कांहीं विशेष नाहीं ! सूनबाईची जरा ठाकठूक केली. आतां बिलकूल भांडायचें नाहीं म्हणून तिनें, थोडयाथोडक्या नाहीं, तेहतीस कोटी देवांच्या शपथा घेतल्या आहेत !

**वारोपंत**—फार चांगलं केलंत वहिनी ! हो, उगीच भांडत बसण्यांत अर्थ काय ? आमच्या हिनं शाळूचा हट्ट सोडून चट्कन् अपराध कबूल केला; मिटलं कीं नाहीं लगेच भांडण ? [ **गगंशा** येते.

**गगंशा**—नाहीं हो नाहीं. कवीश्वर कुठं सांपडत नाहींत ! त्यांना शोधून शोधून माझ्या पायांचे तुकडे पडायची वेळ आली. आतां काय करूं ? कुठं हो पाहूं त्यांना ? [ **वक्रतुंड** घाबऱ्या घाबऱ्या प्रवेश करतो.

**वक्रतुंड**—पलायन करा ! पलायन करा ! यजमान लंबायमान व्हा ! तो जारकमोत्तेजक सोकाजी रस्त्यापलीकडे उद्यानगृहांत गौरीवर प्रचंड कठोर प्रसंग आणीत आहे. जवरीनं लग्नकुंडांत तिचं होमहवन करीत आहे ! पलायन करा, पलायन करा ! ( दाखवून ) तिकडे लंबायमान व्हा, धावा, पळा ! मी नगररक्षक राजदूतांना सोकाजीला पकडण्यासाठीं त्वरित घेऊन येतों. पळा, पळा !

**वारोपंत**—जा, घेऊन ये पोलिसांना !

**रागोपंत**—कोण ? सोकाजी ? चला, चला बाबा. चला सर्वजण.

[ वक्रतुंड व गगंशा यांचेशिवाय सर्व जातात.

**गगंशा**—( सचिंत खिन्नतेनें ) जळूळा तो सोकाजी ! नकोच तो सांपडला; पण कवीश्वरांचा कुठं पत्ता नाहीं तो नाहींच !

**वक्रतुंड**—पण कुणाला कर्तव्य झालं नाहीं तें गौरीचं शोधन मींच केलं. केवढं भीषण कार्य ! केवढा दिग्विजय ! ! गौरी गत झाल्यामुळं यजमानांचा

निर्वंश उद्भवला, त्याची संस्थापना केली. केवढा महापुरुष ! बायकांच्या हृदय-गर्तेत प्रचंड कर्म करणारे महापुरुष प्राणनाथ म्हणून प्रस्थापित होतात असं श्रवण करतों. म्हणून गर्गशे, हृदयप्रक्षोभिणी, प्रसन्न होऊन आतां ह्या प्रचंड पुरुषाशींच लग्नाचं कारस्थान कर. माझ्या ठिकाणींच आतां तुझ्या शृंगाराचा स्फोट कर. मुखाचं तिकडे परावर्तन कां ? लग्नकर्मोत्तेजनाचा मी इकडे गुंजारव करतों. इकडे नेत्रसंकेत कर ! माझ्याकडे लंबकर्ण कर !

**गर्गशा**—वक्रतुंड कशाला उगीच श्रम घेतां हे ? तुमच्या गुंजारवाचा कांहीं उपयोग होणार नाहीं. कवीश्वर सांपडत नाहींत म्हणून विरहानं माझं हृदय पोळत आहे ! कवीश्वरासंबंधानं कांहीं तरी पक्कं ठरल्याशिवाय या हृदयांत तुमचा प्रवेश कसा होणार ? जा, व्हा चालते इथून. कवीश्वरांना शोधून शोधून मी अगदीं दमलें आहें. थोडी विश्रांति घेतें. पुन्हा जायचं आहे मला त्यांच्या शोधासाठीं.

**वक्रतुंड**—तो कायमचा अदृष्ट झाला ! कायमचा अंतर्धान पावला ! त्याचा अवतार संपला ! बापाच्या धास्तीनं अतःपर तो इथं आपलं मुखावलोकन करणार नाहीं. खात्रीनं तो निजधामास गेला आणि यदाकदाचित् त्याचा उत्पात झालाच तरी गौरी-कवीश्वर, दोघांच्याही पूर्वजांनीं त्या दोघांचंच लग्नघटियंत्र जुळवून पक्कं निश्चित केलं आहे !

**गर्गशा**—पण त्यांनीं ऐकलं पाहिजे कीं नाहीं ?

**वक्रतुंड**—दोघं ऐकणार नाहींत तर सारे पूर्वज संमेलन करून तें कारस्थान, जबरदस्तीनं पार पाडतील ! तेव्हां तूं कां बरं व्यर्थ तुझी विषयासक्ति कवी-श्वराच्या ठिकाणीं वर्धमान करतेस ? त्याची आशा व्यर्थ आहे ! निराश हो निराश हो आणि आतां माझ्याच ठिकाणीं विरक्त हो !

**गर्गशा**—पण वक्रतुंड, ह्या साऱ्या गोष्टी, गौरी त्या सोकाजीच्या हातून सुखेपणीं निभावून सुटली तरच्याच ना ? विसरा तें, महा वस्ताद आहे तो सोकाजी, थोडीच गौरीला हातची जाऊं देणार !

**वक्रतुंड**—हा महापुरुष जिवंत असतांना त्याची काय बिशाद आहे ! मक्षिकेसारखा त्याला भक्षण करीन; ढेंकणासारखा त्याचा घात करीन ! दुष्टा सोकाजी, अमानुष कृष्ण-कारस्थानांची एकावर एक रचना करतोस ? गौरीशीं

जबरीनं ब्राह्मण्य जोडून सहवीर्य करूं पहातोस ! थांब, येऊन एका क्षणांत तुझा आत्मघात करतों. अहो आकाशस्थ परमेश्वरांनो, सोकाजीच्या हातून गौरीचं उच्चाटन करायला मला अघोरशक्ति द्या. चल गर्गशे, ह्या महापुरुषाचा पराक्रम पहा, राजदूतांना घेऊन येतों आणि सोकाजीला नामशेष करून गौरीला गृहिता गमा करतों आणि मग तूं माझ्याशीं संघाटित होण्याचं नाकारशील तर तुझंही जबरदस्तीनं करपीडन करतों ! चल. (तिचा हात धरतो.)

**गर्गशा**—हें काय हें ? ठाऊक आहे मला तुमचा प्रताप ! सोडा माझा हात आणि जा एकटेच पराक्रम गाजवायला ! मी नाहीं येत.

**वक्रतुंड**—आतां तुझा गोब्राह्मणप्रतिपालक मीच ! चल. [ ओढून नेतो

---

## प्रवेश तिसरा

[ **स्थळ**—बागेमधील कोच. मागें बंगल्याचा दरवाजा. **सोकाजी** **गौरी**चा हात धरून तिला ओढींत आणतो.]

**गौरी**—सोडा माझा हात, सोडा म्हणतें ना ? हें काय असे एकदम अंग चटीस येतां ? मी कवीश्वरांची वाट पहातें आहें. तुम्ही इथं कसे आणि कशाला आलांत हो ? ते कुठं आहेत ? त्यांनीं तरी मला अशी इथं कशी आणली ? आणि सोडून कुठं निघून गेले ?

**सोकाजी**—कुठं का जाईना ! माझ्याजवळून तो तुला उपटूं पहात होता ती शेवटीं सांपडलीसच ना माझ्या हातांत ! गांठलीच ना तुला !

**गौरी**—मोठा पुरुषार्थच केलांत ! भाबड्या मुलीला फसवून तिचा फायदा घेणारे भामटे चोरच तुम्ही ! संधीची मुळीं वाटच पहात असायचे. भपकेबाज पोषाखानं आणि गोड गोड बोलण्यानं—

**सोकाजी**—बऱ्या बोलानं लग्नाला कबूल हो, नाहींतर—(अंगावर जाण्याचा आविर्भाव करतो. )

**गौरी**—काय ? काय ? नाहीं तर काय ?

**सोकाजी**—अरे, अरे, अरे, अरे ! गौरी, तुझी खरोखर मला कींव ये कींव ! आणि तुझ्यासारख्या भोळीला फसवावं तरी किती असं वाटूं लागतं

अग, कवीश्वर आणि मी एकच आहों. नाहीं—म्हणजे काय वाटेल तें करून तुला उपटायची असं आम्हीं संगनमत केलें; पण तूं पडलीस अपरिचित तोंड-बाज, त्यामुळं तुला खरोखर कसा नवरा पाहिजे तेंच आम्हांला कळेना! तेव्हां ठरवलं, त्यानं व्हावं कवीश्वर आणि मीं व्हावं सोकाजी! तो आणि मी एक होऊन हा सारा तुला फसविण्याचा घाट घातला आहे आम्हीं! ( लडिवाळपणानें जवळ जाऊन ) ह्या कामीं तो आणि मी एकच आहों. ये, तूं आपली माझी ती ( ती रागानें लांब होते. )

**गौरी**—( कानांवर हात ठेवून ) शिव! शिव! परमेश्वरा! नको—कवीश्वर पण अजून येत नाहींत—( अंगावर जाऊन ) दुष्टा, नीचा, अधमा—तुला आतां म्हणूं तरी काय मी!

**सोकाजी**—कवीश्वर म्हण आणि हा तुझा हात असा माझ्या गळ्यांत घाल! ( जबरीनें त्याप्रमाणें तिचा हात घेतो. )

**गौरी**—( त्याला बुकलून ) ~~सोड—सोड—सोड—मेल्या, सोड मला~~! काय ~~करूं~~! कवीश्वर, ~~धांवा हो~~ धांवा! कवीश्वर—कवीश्वर~~—आतां काय करूं~~ आई—आई~~—धाव ग धाव, बाबा, धांवा~~ हो ~~धांवा~~! कवीश्वर—कवीश्वर—~~धांवा, धांवा, धांवा~~ आजोबा!

[ **कर्कशराव** पुढें व मागें **रागोपंत, रागिणी, वारोपंत, वारूबाई** अशीं जलदीनें घाबरलेलीं धावत येतात. सोकाजी दबकून गौरीला सोडतो पण हातांत हात कायम ठेवतो.]

**कर्कशराव**—सोड तिचा हात, बदमाष! पाहिलीत, पोर अंतःकरणाची किती चांगली आहे? पण तुमच्या ह्या स्वभावामुळं तिच्यावर कसकसे प्रसंग आले पहा! चोरा, बहुरूप्या, कोण आहेस रे तूं? थांब, तुला पोलीसच्या ताब्यांत देतों.

[ **वक्रतुंड** पोलिसांना घेऊन येतो.]

**वक्रतुंड**—( प्रवेश करून ) यजमान, अवलोकन करा.; हे काळे राजदूत ही घेऊन आलोंच आहें!

**कर्कशराव**—पकडा रे या भामट्याला आणि हा बदमाष सोंग घेऊन पोरींना फसवतो म्हणून याच्यावर खटला ... घाला हातबिड्या!

**कवीश्वर**—अरे ! हें काय भलतंच झालं ? ही नाटकाची ट्रॅजिडी होते नाटकांतील नायक अशा तऱ्हेच्या अडचणींत सांपडलेला मीं कधींच पाहिला नव्हता ! असला प्रवेश नाटकांत घालण्याचं मीं मुळींच ठरवलं नव्हतं ! आता काय करावं ? अहो आजोबा—

**कर्कशराव**—चूप, चोरा ! तुझ्या या सोंगाकरितां अशीच शिक्षा झाली पाहिजे तुला !

**कवीश्वर**—अरेच्या ! माझा वेषपालट आजोबांना पसंत आहे असं मी समजत होतों तें खोटं कीं काय ? मग माझं नाटककाराचं मनुष्यस्वभावाचं निरीक्षण चांगलंच आहे म्हणायचं ? पण, छे ! छे ! या म्हाताऱ्याचा यांतही कांहीं तरी डाव असला पाहिजे !

**कर्कशराव**—मग काय रे बेरडा ? होतोस कीं नाहीं प्रगट कोण आहेस ते

**कवीश्वर**—हा मी कवीश्वर नव्हे का ?

[ सर्वजण आश्चर्यानें व कौतुकानें पहात 'काय कवीश्वर' असें म्हणतात.]

**कर्कशराव**—काय रे धारोपंत ! आतां तरी कबूल करतोस कीं नाहीं हुंडा न घेतां कवीश्वराशीं गौरीचें लग्न लावायला ? पहा मुद्देमालासह तुझा पोरगा पकडला आहे. सोंग घेऊन लोकसमाजांत वावरणें हा फौजदारी गुन्हा होतो. तुला माहीत असेलच ! काय ? पोहोंचवूं का याला ठाण्यावर ?

**धारोपंत**—अहाहा ! काय पण कारटा गुणी निघाला ? हीं अ[illegible]ची शिकलेलीं पोरं ! काय करूं ! या म्हाताऱ्याचा डाव, कारटयाच्या ह्या कृतीमुळं साधला ! काय करूं ? बरं बुवा ! तुम्हीं म्हटल्याप्रमाणं अडीच हजार घ्यायला मी कबूल आहें.

**कर्कशराव**—काय रे चिकटया ! हीं काय कलिंगडं विकतो आहेस होय रे ? एक पैही हुंडा देणार नाहीं. बोल ! होतोस कबूल-का देऊं याल पोलिसांत ?

**धारूबाई**—करा हो, करा कबूल. माझ्या कवशावर फौजदारी होणार त्याला तुरुंगाच्या कोठडींत कोंडणार ! ते तुरुंगाचे गज ! तो आंत केविलव[illegible]; मुद्रेनं धाय धाय रडत असलेला माझा कवशा ! माझा लाडका कवीश्वर ! न हो-नका ! माझ्या कवशाला पकडूं नका. नका हो नका, त्याला असा तु[illegible]रुंगा-च्या कोठडींत कोंडूं नका !



ोरीः ेशराव—म्हण, रागोपंतस्य पुत्रीम्. [ पृष्ठ १२३.

**वारोपंत**—अग अग हें काय ! गौरी चवचाल म्हणून तुम्हाला सून नको होती ना !

**वारूबाई**—गौरी कशी असली तरी मी तिला सांभाळीन ! तिनं कितीही त्रास दिला तरी तुमच्याजवळ मी कधींही तक्रार करणार नाहीं ! पण माझ्या लाडक्या कवशाच्या कपाळीं तुरुंगाचा डाग लागूं देऊं नकाहो !

**रागिणी**—भाऊजी, आम्हीं बायकांनीं मध्यें बोलूं नये हे खरं; पण करा कबूल मामंजींचं म्हणणं, माझी सोन्यासारखी गौरी म्हणजे-हो सोनंच आहे तें ! तावून-सुलाखून निघालं आहे ! घ्या तें पदरांत !

**वारोपंत**—बरें आजोबा ! तुमचं म्हणणं मला कबूल आहे. मी पै पै जोडतों ती तरी ह्या पोराकरतांच ना !

**कर्कशराव**—हं ! आतां कसें ठीक बोललास ! तुझा हा आग्रह सुटला, संतोष झाला. आतां माझा राग्याही आपल्या ऐपतीप्रमाणें तुला हुंडा देईलच. त्याला कांहीं कमती नाहीं, आज एकुलती एक पोर पण ही आजकालची पोर ! पण करतां काय ! बदलत्या काळाकडे जरा थोडें लक्ष द्यायला हवें !

**कवीश्वर**—आजोबा, माझं हें सोंग तुम्हांला पसंत आहे असें समजून मी हें सारं करीत होतों ना !

**कर्कशराव**—गाढवा, तुझें हें सोंग पसंत पडायला मी का तरुण आहें ! कां या साऱ्यांच्या डोळ्यांत अंजन घालण्याकारितां त्याचा उपयोग करून न घेण्याइतका म्हातारा झालों आहें ! पाहिलात कसा नाटकी आहे पोर !

**कवीश्वर**—( हात जोडून ) सर्व वडील मंडळींनीं मला क्षमा करावी.

**वारोपंत**—खरंच, काय गाढवानं नाटक केलं हो !

**वारूबाई**—आहेच तसा माझा कवशा ! दृष्ट काढली पाहिजे पोराची ! कसं ग बाई नाटक केलं तरी !

**कवीश्वर**—आजोबा, मला वाटतं आटोपलं हें नाटक !
बरं वाटलं.

**कर्कशराव**—चांगलं केलेंस ! आणि तुम्ही पण सारींजणं लक्षांत ठेवा हं, साप साप म्हणून दोर असला तरी मनाला वाटलेली भीति आणि झालेले परि-

नाम कांहीं खोटे नव्हत ! विबुध राम वदो भलत्या मिषें । सकल पातक भस्म करीतसे ॥ काय रे तुला नाटकाचें बक्षिस हवें असेल ना रे बोक्या !

**कवीश्वर**—दुसरं कोणतं बक्षीस ! मीं हें दूध जमिनीवर लवंडलं खरं ! आतां बडगा दाखवून हांकलून नका लावूं !

~~**बाळूबाई**—मामंजी, होऊं द्या मुलांच्या मनासारखं !~~

**कर्कशराव**—आमच्या गौरीला मायेनं वागवून तिच्याजवळ केव्हांही भांडूं नको अं ! पण जर का ती बेशिस्त वागूं लागली तर खुशाल दे चार मुस्कुटांत ठेवून ! लाड खाण्यापिण्यांत, शिस्तच्या बाबतींत चाबूकच पाहिजे ! रागू, चल ये इकडे, आणि गौरीचा हात आतां कवीश्वराच्या हातांत देऊन कर जांवयाला तिचें वाग्दान, हं म्हण, " कर्कशस्य पौत्रीम् "—

**रागोपंत**—( रागिणी हाताला हात लावते ) रागोपंतस्य पुत्रीम् इमाम् गौरी नाम्नीम् कन्याम् । वारोपंतस्य पुत्रम् कवीश्वरम् संप्रददे. [ कवीश्वर वारोपंताकडे पाहतो. ]

**वारोपंत**—अरे म्हण, म्हण प्रतिगृह्णामि.

**कवीश्वर**—प्रतिगृह्णामि.

**गणेशा**—( वक्रतुंडाला हातानें ओढीत पुढें येऊन ) हें असं ! तर मग माझे आपले आहेतच वक्रतुंड !

**वक्रतुंड**—तथास्तु !

**कर्कशराव**—घटका गेली, पळें गेलीं तास वाजे ठणाणा । आयुष्याचा नाश होतो राम का रे म्हणाना ॥ [ सर्व ताल धरून एक दोन वेळां म्हणतात. ] झालें एकदांचें. आतां येवढें कार्य उरकलें म्हणजे आम्ही चाललों कोंकणांत !

**रागिणी**—पण मी बरी जाऊं देईन आपल्याला ! आतां माझी परवानगी घेतल्याशिवाय नाहीं हो जायचं !

[ सर्वजण कर्कशरावाला नमस्कार घालतात ]

**वक्रतुंड**—सहनाववतु सहनौभुनक्तु सहवीर्यं करवावहै ॐ शांतिः शांतिः शांति : !

समाप्त